# चोरी कशी करावी ?

लेखक

अच्युत बळवंत कोल्हटकर

प्रकाशक

नरहर रामचंद्र जोशी.

१९२५.

आवृत्ति १ ली ] [ किंमत एक रुपया.

# वाचकांस विनंति

एवढीच कीं हे पुस्तक अगदीं भीत भीत आपणांपुढें ठेवलेले आहे. ह्या पुस्तकाचा उद्देश काय तो आतील मजकुरा वरून आपणास कळेलच, परन्तु पुस्तक वाचल्यावर त्याचेविषयींचा अभिप्राय चोरून मनात ठेवूं नका. कारण महाराष्ट्रिय वाचकवर्गाचा सहृदय अभिप्राय हीच प्रस्तुत लेखकास अत्यन्त मुल्यवान् वस्तु आहे.

मुम्बई
वर्षप्रतिपदा, स्वातंत्र्यशक २९२

आपला नम्र,
पुस्तककर्ता.

# अनुक्रमाणिका


| प्रकरण | विषय | पृष्ठ. |
|---|---|---|
| प्रकरण १ लें | कामिनिया हेअर ऑईल | १ |
| प्रकरण २ रे | पहिलें चुम्बन | ७ |
| प्रकरण ३ रें | न्यायाचा "स्पेशल" अवतार! | १४ |
| प्रकरण ४ थे | बाळू, असें सांग अं! | २० |
| प्रकरण ५ वें | जिथें तिथें हीच रडकथा ! | २७ |
| प्रकरण ६ वें | "परनार विषाचा प्याला" | ३५ |
| प्रकरण ७ वें | "मला मुबईला जायचंय्" | ४२ |
| प्रकरण ८ वें | पुणेरी भामटे | ५१ |
| प्रकरण ९ वें | हे पहा पायघोळ संत ! | ६० |
| प्रकरण १० वें | कलकत्त्याजवळील एक बंगला | ६८ |
| प्रकरण ११ वें | कुत्रा आणि संन्यासी | ७५ |
| प्रकरण १२ वें | गाय ! कुठली गाय ? | ८३ |
| प्रकरण १३ वें | औधकराची " बेबदशाही " | ९१ |
| प्रकरण १४ वें | अफझुलखानास सॉलीसिटरची नोटीस | ९८ |
| प्रकरण १५ वें | गुलामगिरीच्या वणव्यांत | १०५ |
| प्रकरण १६ वें | हरिश्चन्द्राचे वेळेपासून | १११ |
| प्रकरण १७ वे | गांधींच्या " हिमालयन् मिस्टेक्स् " | १२० |
| प्रकरण १८ वे | श्रीशिवाजी महाराजकी जय | १२९ |
| प्रकरण १९ वें | सत्याचा रणदुंदुभि | १३७ |
| प्रकरण २० वें | चोरी कशी करावी ? | १४४ |

# चोरी कशी करावी ?



## प्रकरण १ लें.

### कामिनिया हेअर ऑइल्



चोरी कशी करावी हें शास्त्र जितकें नवें आहे तितकेंच जुनेंही आहे हें शास्त्र नवें आहे असें वाचकांना सांगायला नकोच. कारण जी गोष्ट सत्य आहे ती सांगण्यांत चोरी कसची? वाटेचा चोरही कबूल करील कीं ह्या शास्त्रावर अजून कोणताही प्रमाणभूत ग्रंथ झालेला नाहीं निदान मराठीत तरी ह्या विषयावरील हा पहिला ग्रन्थ आहे व आह्मी एवढेंच प्रामाणिकपणानें सांगूं शकूं कीं ह्या पुस्तकांत आह्मीं कोणाच्याही मजकुराची चोरी केलेली नाही.

ह्या शास्त्रावर आजपर्यन्त कोणताही प्रमाणभूत ग्रन्थ कां झालेला नाहीं ह्याचें कारण काय असा प्रश्न वाचकवर्ग आपल्या मनास निदान चोरून तरी विचारील, व त्याबद्दल त्याना निरनिराळीं उत्तरेंही कदाचित् सुचतील. कुणाला असें वाटेल की जगात चोऱ्या इतक्या थोड्या आहेत कीं त्याचेवर शास्त्र बनविण्याइतकी त्याना

योग्यता आलेली नाहीं. कुणी ह्या जगात चोराची संख्या अल्प आहे असें समजत असतील. कुणाला चोरी हा धन्दा हलका आहे असें वाटत असेल. जगात हलके लोकच हा धन्दा करीत असतील असाही कुणाचा तर्क होत असेल. कुणाला चोरी ही गोष्ट शास्त्रसिद्ध मा[illegible]त असेल कुणी शास्त्राचें व चोरीचें [illegible] आहे असें अनुमान करीत असतील. कुणी चोरी ती काय व [illegible] शास्त्र ते काय बनविले जाणार अशा समजुतीवर [illegible] असतील व चोराच्या भीतीनें त्या [illegible] पळले [illegible] असें कुणी मानून चालत अस[illegible] पण [illegible] मानून चालायचें नाहीं वगैरे सर्व [illegible] अगदी मिथ्या आहेत चोरी [illegible] शास्त्र हलकेंही नव्हे [illegible] लोकांचेंही नव्हे [illegible] थोरांपर्यन्त—रङ्कापासून राजापर्यन्त—चोरापासून साधापर्यन्त— सर्वांचें हें शास्त्र आहे आणि ह्मणून ह्या शास्त्राचें सर्वांनी अध्ययन करणें जरूर आहे.

कुणाकुणाला—ईश्वर राजाचें रक्षण करो—असें वाटत असेल की ह्या शास्त्राचें अध्ययन ते काय करायचें ? हें शास्त्र मनुष्याला निसर्गत:च येत असेल. प्रयत्न केला—ईश्वर राजाचें रक्षण करो— तर चोरी करायला साधारणपणें कुणालाही अडचण पडायची नाहीं पण ही समजूत चुकीची आहे. मनुष्याला अशा शेंकडो गोष्टी येत असतात, पण त्या सशास्त्र कशा करायच्या हें त्याला शिकावेंच लागतें. नौकानयन, आकाशयान, प्रकाशालेख्य, ध्वनिवाहन वगैरे

मोठमोठ्या गोष्टी सोडून द्या. त्याचें सशास्त्र अध्ययन केल्याशिवाय त्या कुणालाच येत नाहींत. पण रोजच्या व्यवहारातल्या ज्या अनेक गोष्टी, त्यांचींही आता शास्त्रें बनलेलीं आहेत व त्या सशास्त्र करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होत चाललेली आहे. जेवावें कसे ह्याचे आता शास्त्र बनलेलें आहे व उपाशी कसे रहावे ह्याचेंही शास्त्र बनलेलं आहे. पहिला सूपशास्त्राचा ( सूप म्हणजे soup नव्हे लक्षात ठेवा ) एक भाग आहे व दुसऱ्याची लंघनचिकित्सा बनली आहे कुणी म्हणेल, उपाशी रहायचें ह्यात शास्त्र कसलें ? काही लागत नाही कीं मनुष्य उपाशी राहिला. मग त्यांत शास्त्रीय उपाशी रहाणें काय आणि अशास्त्रीय उपाशी रहाणें काय ? पण हें खरें नाहीं. उपाशी रहायचें ते सशास्त्र पद्धतीनेंच राहिलें पाहिजे. लंघनशास्त्राचें उल्लंघन करणें की अशास्त्र उपाशी रहाणें म्हणजे काय हे ताबडतोब तुम्हाला समजेल.

त्या जेवणाच्या शास्त्रावरूनच दातांच्या शास्त्राकडे लक्ष्य जाणें अगदीं साहजिक आहे. अलीकडे जेवण्याच्या शास्त्रापेक्षांही दातांचे शास्त्रास फारच महत्त्व आलेलें आहे मुंबईत तर अलीकडे दातांच्या दवाखान्यांचा इतका सुळसुळाट झालेला आहे की शिंप्याच्या दुकानांचे अगोदर दाताच्या दवाखान्याची पाटी दिसते ह्यातही चीड आणण्याजोगी गोष्ट ही आहे की ह्या पाट्या खुशाल गिऱ्हाइकाकडे आपले कृत्रिम दात काढून बघत असतात दन्तवैद्यांनी जगावर इतका दांत का धरावा हा प्रश्नच आहे. कारण रावणासारख्या चक्रवर्ती भूपतीस दहा दहा तोंडें व तीन तीनशें दांत

असूनही त्याचे वेळीं माकडछाप टुथपावडर अथवा जर्मन् टुथब्रश मुळींच नव्हते. पण असें असूनहि त्याचे दांत शेंवटपर्यंत शाबूत होते, इतकेंच काय, पण अखेर मृत्यूचा प्रसंग आला तरी त्यानें माफीकरितां कधीही शत्रूपुढें दात विचकले नाहींत॥

केसांचेंही असेंच आहे. त्याचेंही शास्त्र अलीकडेच बनत चाल-लेलें आहे. पूर्वी शकुन्तला, दमयन्ती, सीता, सावित्री ह्यांची सुंदर केशकलापाबद्दल फार प्रसिद्धि होती. सुन्दर स्त्रियांस त्या काळी "सुकेशी" हा प्रत्यन्तर शब्द लावीत असत द्रौपदीच्या वेणीनें तर इतिहासात फारच मोठी क्रान्ति घडविलली आहे. महाभा रतात भीमाच्या गदेचें जितकं महत्त्व आहे त्यापेक्षाही द्रौपदीच्या वेणीनें ज्यास्त महत्त्व आहे तरी त्या वेळी केशशास्त्र चांगलेंसें बनलेले नव्हते "कामिनिया" हेअर ऑइल त्या वेळीं माही-तही नव्हतें व पुष्पराज, केशरंजन, केशवकान्त, ऑटो मोहिनी ह्यांचाही त्या वेळीं उगम आलेला नव्हता नवीन पुस्तकावर "कामिनिया" ची जाहिरात मिळते हें जर व्यासाना माहीत असतें तर त्यानीं प्रत्येक पर्वाचे निरनिराळे भाग करून ते निरनिराळे प्रसिद्ध केले असते व १८ पर्वांचे ऐवजी १८० पर्वें लिहिली असती.

पण गतं न शोचेत ! मनुष्यानें गेल्याबद्दल दुःख कधींही करूं नये. त्यात कांहीं एक अर्थ नाहीं. मनुष्यानें नेहमीं पुढें पहात असावें. मागें पाहूं नये. मागें पाहिल्यानें व्यर्थ उसासे मात्र निघ-तात. पुढील मार्गक्रमणाची त्यात युक्ति निघत नाहीं. महाभार-

तात्रे काळीं कामिनिया ऑईल असतें तर महाभारताचीं पर्वें वाढ-
ली असती ही गोष्ट खरी आहे, पण १८० पर्वांपर्यंत महाभार-
ताच्या स्फूर्तीचा ओघ सतत टिकला असता कीं नाहीं हाही त्या-
बरोबर प्रश्न निघतोच. कुणी म्हणतील कीं व्यासांची स्फूर्ति एवढी
दाण्डगी होती कीं ती कधींही ओसरली नसती. कुणी ह्मणतील,
१८० पर्वांपुढें व्यासांनींसुद्धा हात टेकले असते. कुणी ह्मणतील
कीं मेन्दूला थोडासा थकवा आल्याबरोबर व्यासांनीं कामिनिया
हेअर ऑईलच लावलें असतें पण ह्या नुसत्या कल्पना आहेत.
त्यांपैकीं खऱ्या कोणत्या हें पारखण्याचें आज कांहींच साधन नाहीं.
ह्यात सर्वांना संमत अशी एकच गोष्ट आहे आणि ती ही कीं
जर व्यासांना १८० पर्वें लिहिण्याचा कदाचित् प्रसंग आला
असता तरी त्यांनी कुणाचीही चोरी केली नसती.

पण ह्याबद्दल व्यासाची तारीफ केली पाहिजे असंमात्र नाहीं
कारण व्यासाचे वेळीं चोरीचें शास्त्रच मुळीं नव्हतें, मग चोरी कर-
ण्याचा मार्ग त्यांना सापडणार कोठून ? चोरीचें शास्त्र हें अगदी
नवीन आहे. आह्मीं सुरवातीस ह्मटल्याप्रमाणें कदाचित् ह्या
शास्त्रावरचा हाच पहिला ग्रन्थ असेल. पण जर एखाद्या इतिहास-
संशोधकास ह्याचे अगोदरचा एखादा ग्रन्थ सांपडला तर त्यानें
आमचेवर चोरीचा आरोपमात्र करूं नये. कारण आह्मी त्यास
" ॲज ए जण्टलमन् " सांगतों कीं आह्मी चोर नाहीं. चोरांचा
व आमचा सम्बन्धही नाहीं. हा ग्रन्थ आह्मी केवळ " शास्त्र "

ह्मणून लिहीत आहोंत. ह्यात आमची केवळ " अकॅडेमिक् " दृष्टि आहे व कोणच्याही ' अकॅडमी " मध्यें हा ग्रन्थ ताबडतोब नेमला जाईल असें जरी आह्मास वाटत नाही, तरी जिथें शास्त्र-वृद्धीची लालसा आहे तिथें ह्या नूतन शास्त्राचे अध्ययन केलें जाईल अशी आमची खात्री आहे.

पण ज्या वेळी ह्या शास्त्रास आह्मी 'नूतन' ह्मणतो त्या वेळी आह्मास हें पुन्हां सांगितलें पाहिजे की हें शास्त्र जितकें नवीन आहे तितकेच ते जुनेही आहे. ह्या शास्त्रावर आजपर्यंत ग्रन्थ नाहीत ही गोष्ट खरी, पण कार्तिकेयाने ह्या विद्येस एके काळी उत्तम शास्त्र बनविलेलें होते. दुर्दैवाने त्या वेळचे ग्रन्थ आज प्रसिद्ध नाहीत, मग, ह्या शास्त्राचे कुणी भोक्ते न मिळाल्यामुळे ते ग्रन्थ बुडाले की ते ग्रन्थ प्रसिद्ध झाल्याबरोबर त्यांनेवर चोरांच्या उड्या पडल्या हें काहीं सांगता येत नाहीं तूर्त दुःखाने नमूद करायची गोष्ट ह्मणजे एवढीच कीं हल्ली ते ग्रन्थ बुडाल्यामुळें त्यातील सर्व वचनं चोरून घेऊं ह्मटलें तरीही तशी सोय राहिलेली नाहीं

पण ह्या शास्त्रास जुनें ह्मणण्याचे आणखीहि एक कारण आहे--

---

**प्रकरण १ लें.**

(१) चोरीचें शास्त्र जितकें नवें आहे, तितकेंच ते जुनेंही आहे.

(२) हे शास्त्र इतकें नवें आहे कीं कदाचित् ह्या शास्त्रावरच हा पहिलाच ग्रंथ असेल.

(३) पण हें शास्त्र जुनेंही आहे. त्यावर कार्तिकेयाने एक ग्रंथ रचलेला होता.

(४) पण तो ग्रन्थ आज उपलब्ध नाहीं व त्यातील सर्व वचने आज चोरून घेऊं ह्मटले तरी ते शक्य नाहीं.

# प्रकरण २ रें.

## पहिलें चुम्बन



आणि ते हे की चोरीची विद्या ही अत्यन्त प्राचीन आहे. ह्या जगातलि प्रत्येक मनुष्य चोर आहे.

आमचें हे विधान पुष्कळास पटणार नाही. आम्ही प्रत्येक मनुष्यास चोर ह्मटल्यामुळें कित्येकाच्या अंगाची तर लाही लाही होईल. पण खरें बोलायला भिडभाड धरना उपयोगी नाही. सत्य चोरून ठेवले तर चोरींतील सत्य कधीही बाहेर यायचें नाहीं.

काय ? जगातलि प्रत्येक मनुष्य चोर आहे ? जगात एकही मनुष्य साव नाहीं ?

नाही. जगातलि एकही मनुष्य साव नाही. जगातलि प्रत्येक-जण चोर आहे

आणि हे सिद्ध करायला फारसे लांब जायला नको.

प्रत्येक मनुष्याच्या चेहेऱ्याकडे पहा. त्याचा चेहेराच सांगत असतो की तो चोर आहे. बेमालूम रीतीनें त्यानें एक डल्ला मारलेला आहे.

आणि तो डल्ला कशावर ?

आई आणि बाप ह्याच्या शारीरिक ढबीवर. प्रत्येक मनुष्याच्या शरीरात ही ढब स्पष्ट रीतीनें उमटलेली असते. प्रत्येक मनुष्यांच्या

मुद्रेंत त्याची माता असते. प्रत्येक मनुष्याच्या मुद्रेंत त्याचा पिता असतो. माता आणि पिता ह्यांचें शरीरसौष्ठव प्रत्येक मनुष्यानें इतक्या बेमालूम रीतीनें चोरलेलें असतें कीं हा "चोरीचा माल" त्याच्या मुद्रेवर स्पष्ट रीतीनें दिसत असूनही तो त्याचेपासून परत घेता येत नाहीं. तो त्यानें कायमचा बळकावलेला असतो. तो त्यानें खुबीदार रीतीनें मिश्र केलेला असतो इतका कीं तो ओळखता येतो पण निवडून काढता येत नाहीं. मग प्रत्येक मनुष्य चोर नाहीं असें कसें म्हणता येईल? आणि ह्यावरून मनुष्याला चोर म्हटलें तर त्याला राग तरी का यावा?

आपल्या बालकासम्बन्धानें मातापितराच्या अतिशय गोड भावना असतात. त्याना आपले बालक कुठें ठेवूं आणि कुठें न ठेवूं असें झालेलें असतें. बालकाचें कितीही लालन केलें तरी तें त्याना अपुरें वाटतें. जगातील सर्व रत्नें व माणकें ह्या चिमुकल्या जिवाकरितां साठविलेलीं आहेत असें त्यांना भासतें. तो त्यांचा अमोलिक ठेवा असतो. तो त्यांच्या सर्वस्वाचा मधुर खजिना असतो. जगांत ते वाटेल त्या वस्तूला विसम्बतील पण आपल्या अपत्याला तीं कधींही विसम्बायचीं नाहींत.

पण ह्या त्याच्या प्रेमाचा फायदा हा "चोर" अगदीच चमत्कारिक रीतीनें घेत असतो. मातापितरांची छबी त्यानें अगोदरच चोरलेली असते त्याचबरोबर सौन्दर्याच्या सर्व लहरी त्यानें त्यांचेपासून हिरावून घेतलेल्या असतात. पण इतकेंच करून तो थाम्बत नाहीं. आईबाप जों जों मुलांवर ज्यास्त आसक्त होतात तों तों मुलगा त्यांची

ज्यास्त उचल्याच चोरी करायला लागतो आपलें ह्मणणें, खेळणें, चालणें, बोलणें हें सर्व त्यानें आपल्या आईबापावरून "उचललेलें" असतें. तीं जी जी कृति करतात ती ती तो त्याचेपासून ताबडतोब "उचल" तो. इतकी एकसारखी उचल जर कुणीं केली तर "उचल्या" ह्मणून त्याची चोहोंकडे नापत होईल व त्यास कुणी घरातही येऊ देणार नाहीं. पण ह्या "उचल्या"चें मात्र तसें काहींएक होत नाही उलट जों जों तो ज्यास्त उचलेपणा करायला लागतो तों तों आईबाप त्याचें ज्यास्त कौतुक करतात.

आईने घेतलेल्या मुलाचे चुम्बनात किती गोडी असते! खरें "पहिलें" चुम्बन तें हें! ह्या पवित्र माधुर्याची सर दुसऱ्या कोणत्याही मधुरतेला यायची नाहीं. जगात माधुर्य आणि पवित्रता ह्याचा अपूर्व संगम जर कोणत्या चुम्बनात बघायचा असेल तर तो ह्या ठिकाणी होय कवींची स्फूर्तिजनक काव्यें जर व्हायला हवीं असतील तर तीं ह्यावरच झालीं पाहिजेत. बालकाला हास्य जर फुटत असेल तर तें ह्या चुम्बनामुळेंच होय. एरवीं मुग्ध हास्याचे नाजुक तुषार उडायला ह्या अमृताच्या झऱ्याशिवाय दुसरें कोणतें कारण सापडणार? ह्या अमृताचे चषक जों जों बालकाच्या प्रमुदित अन्तःकरणात ओतले जातात तों तों आनन्दाचें कारंजें तुडुम्ब भरतें व त्यातून हास्याचे फवारे फुटू लागतात. ह्या सुधानिधीचें वर्णन कुठवर करावें! मनुष्य ६० वर्षांचा जख्खड ह्मातारा झालेला असला व नकाशात काढलेल्या रेल्वेच्या फांट्याप्रमाणें जरी त्याचें तोण्ड

सुरकुत्यानी चितारलेलें असले, एखाद्या विश्वासघातकी नोकराप्रमाणें जरी सर्व मानवी देखणेपणा त्याला सोडून चालता झालेला असला, जरी " थकवा " ही एकच वृत्ति त्याचेजवळ उरलेली असली आणि जरी विषयासक्तीच्या कर्दमित उपभोगामुळें त्याच्या वासना-तील सुवास अजीबाद गेलेला असला तरी जर त्याच्या मातेने त्याच्या बालमुखाचें घेतलेले चुम्बन त्याला आठवेल तर त्याही खिन्न शरीरवृत्तींत त्याच्या शरीराची कातडी सात्त्विक भावनेनें ' टच्च " करायला लागेल व एक निमिषभर तरी तो आनन्दात गर्क होईल. कारण मातेनें घेतलेल्या पवित्र चुम्बनाचे माहात्म्यच तसे आहे गंगा आणि गोदावरी सध्याचे पेक्षा दसपट पवित्र झाल्या तरी मातेच्या ह्या पवित्र चुम्बनाची सर त्याना कधीही यायची नाही.

ह्या पवित्र वेळी चोरी करायची कुणाला तरी बुद्धि होईल काय ? पण ह्याही वेळीं तिचा " बाळ " तिचें हृदय, तिचे प्रेम, तिचे अन्तःकरण, तिचे विचार, तिचे बोल, व तिची भाषा चोरून घेत असतो. ज्या भाषेला आपण " मातृभाषा " असे ह्मणतो ती आईपासून मुलाकडे कशी जात असते ? तिने तोण्ड भरून घेत-लेल्या चुम्बनामधून ! तिच्या चुम्बनाच्या रूपाने तिच्या प्रेमाची पांखर ज्या वेळीं मुलावर पडते त्या वेळीं ते मूल नुसते तिचे प्रेमच शोषून घेतें असें नाहीं तर तिची भाषासुद्धा शोषून घेत असतें. प्रत्येक मातृभाषा ही ह्याप्रमाणें चोरीचा माल आहे व भाषा बोल-

णारा प्रत्येक मनुष्य चोर आहे. प्रत्येक मनुष्यास चोर ह्मटल्या-बरोबर ज्याला आमच्यावर रागवावयाचे असेल तो खुशाल रागावो, पण त्याला आह्मास कोणत्याही भाषेतून उत्तर देता येणार नाही. भाषा ही चोरीची जिन्नस आहे कोणत्याही भाषेतून आमचे आरोपास उत्तर देणें ह्मणजे आमचा आरोप कबूल करणेंच होय ह्याचे उलट एखादा मनुष्य जर आमच्या उत्तरादाखल मुग्ध राहील तर " मुग्धता ह्मणजे कबुली " ह्या न्यायानें त्याचेवर आमच्या आरोपाची कबुलीच शाबीत होईल

ह्या सर्व अडचणीतून सुटण्याकरिता आमच्या हिन्दु तत्त्वज्ञानानें मुलास " आत्मा वै पुत्रनामासि " असे ह्मटलेले आहे पण त्यामुळे पुत्रावरील चोरीचा आरोप नाहीसा होण्याचे ऐवजी तो ज्यास्त दृढमूल मात्र होतो कारण पुत्र ह्मणजे प्रत्यक्ष बापच असे ह्मटल्याने बापाचें गुणसर्वस्व मुलाने चोरल्याबद्दलचा आरोप दुणावतो व चोरीच्या आरोपाला तत्त्वज्ञानाचा आधार मिळतो. ख्रिस्ती धर्मशास्त्राने ह्याव-रही ताण केलेली आहे. " मुलगा ह्मणजे प्रत्यक्ष बापच " हे हिन्दु तत्त्वज्ञानातील वचन जास्त दूरवर नेऊन व ईश्वराचा आणि सृष्टीचा पितापुत्रत्वाचा सम्बन्ध ज्यास्त शब्दशः कल्पून ख्रिस्ती धर्मशास्त्रानें असे विधान केलेलें आहे की मनुष्य ह्मणजे प्रत्यक्ष ईश्वरच ! ह्मणजे मुलात जसें बापाचे रूप उतरलेले असते त्याप्रमाणे मनुष्यातही ईश्वराचे रूप उतरलेले आहे ख्रिस्ती पुस्तकात ईश्वराचें चित्र काढताना त्यास खुशाल दाढीमिशा लावलेल्या असतात व त्यास खूप पोक्त आणि वृद्ध बनविलेलें असतें.

ज्यास आपण EVOLUTION अथवा उत्क्रान्तिवाद ह्मणतों त्यामुळेंही मनुष्य चोरच ठरतो. हिन्दु तत्त्वज्ञानानें मुलाला बापाची चोरी करणारा असें ह्मटलें व ख्रिस्ती धर्माने मनुष्याला ईश्वराची चोरी करणारा ठरविलें. उत्क्रान्तिवादानें असा सिद्धान्त बान्धला कीं ह्या जगात मूळचा माल फारच थोडा आहे व बाकी सर्व चोरीची "इस्टेट" आहे. ही चोरीची इस्टेट सर्व सृष्टीभर दिसून येते व तिची एवढी लाम्ब शृंखला जोडता येते कीं भुईवर सरपटणारा साप व आकाशांत विमानें उडविणारा मनुष्य हीं दोन्ही एकाच आळ्यातील मडकीं आहेत हें त्यावरून मुळींच नाकबूल करता येत नाहीं.

ह्या उत्क्रान्तिवादास चौऱ्याशी लक्ष योनींच्या कल्पनेचीही जोड मिळते. ह्या कल्पनेप्रमाणें कृमिकीटकापासून मनुष्यापर्यन्त सर्व प्राणी हे एकमेकाचीं रूपान्तरें आहेत. मनुष्य आपल्या घमेण्डींत स्वतःच्या मिशाना वाटेल तेवढें तूप लावो, परन्तु एवढी गोष्ट खरी आहे कीं पूर्वी तोच मर्कट होता, तोच उन्दीर होता व तोच झुरळही होता. चौर्यकर्मीत तरबेज झालेला चोर ज्याप्रमाणें दिवसें-दिवस गबर होत जातो त्याप्रमाणें प्राणी चित्तत्त्वाच्या अशअंशाच्या चोऱ्या करीन करीत कीटकापासून मनुष्याच्या योग्यतेला पोंचलेला आहे. चौऱ्याशी लक्ष योनींची कल्पना ह्मणजे चौर्य—सिद्धान्ताचें प्रचण्ड प्रत्यन्तरच होय. ही कल्पना व ख्रिस्ती धर्मातील कल्पना ह्या जवळ जवळ एकच होत. त्यातील मर्म एवढेंच कीं मनुष्याचे जवळ स्वतःचें असें काहीं नाहीं. त्यातील जडांश त्यानें कीटकापासून घेतलेला आहे व चिदंश चित्स्वरूपापासून उचललेला आहे. मिळून

काय? प्रत्येक मनुष्य हा उचल्याच ! हा उचल्या ज्यावेळीं "मी" ह्मणून "मी" शीला पीळ घालतो त्यावेळीं ईश्वराला त्याची कींव येते. झुरळासारखे कीटकही त्याच्या मिथ्याभिमानाला हंसून मिशा उडवीत असें ह्मणत असतात की "अरे चोरा, माझ्याअगोदर चोरी करून मनुष्य बनूलास काय? चोरी कशी करावी हें मला कळू दे तर खरें, ह्मणजे मीही तुझ्यासारखा मनुष्य होईन व कदाचित् तुझ्या अगोदरच चिन्मय बनून जाईन."

---

**प्रकरण २ रें:—**

(१) ह्या जगातील प्रत्येक मनुष्य चोर आहे

(२) कारण आईबाप ह्यांच्या शारीरिक द्रव्यांची चोरी त्याने केलेली असते

(३) "आत्मा वै पुत्रनामासि" ह्या वाक्याचा अभिप्रायही असाच आहे.

(४) ह्याच अर्थाने जगताचा पिता जो ईश्वर त्याचे व मनुष्याचे रूप एकच आहे असे ख्रिस्ती धर्माने म्हटले आहे

(५) EVOLUTION [ उत्क्रान्तिवाद ] तत्त्वानेही मनुष्य चोरच ठरतो.

(६) चौऱ्याऐंशी लक्ष योनींच्या कल्पनेतही हाच अर्थ आहे.



# प्रकरण ३ रें

—— ० ——

## न्यायाचा " स्पेशल " अवतार!



तेव्हा जगात प्रत्येक मनुष्य चोर आहे हे आमचें विधान फारसें राग येण्याजोगे नाही हे आता वाचकाच्या लक्ष्यात आलेंच असेल. चौर्य हें विश्वाचा जणूं आधार आहे. चौर्यामुळेंच विश्वाचा प्रपंच थाटला, चौर्यामुळेंच विश्वाचा विस्तार झाला. विश्वात मूळ असत्प्रवृत्ति कशी सुरू झाली हे तत्त्वज्ञानी लोकास मोठें कोडें पडत असतें, पण विश्वाचा पायाच जर चौर्य हा आहे तर विश्वात असत्प्रवृत्ति पाहून आश्चर्य वाटायला कशाला पाहिजे?

चौर्यामुळे जगात मोठा अनर्थ उमळून गेलेला आहे. जगात चौर्यकर्माचा बुजबुजाट झाल्याकारणानें खरें व खोटें ह्याची नुसती खिचडी बनून गेलेली आहे. साव आणि चोर ह्याची निवड करण्याइतकें आजकाल दुसरें कठिण कामच उरलेलें नाहीं. हें काम विशेष कठिण होण्याचें कारण इतकेंच कीं जगांतले चोर हुबेहुब सावासारखा पोषाख करतात आणि साधुपणात सर्वांपेक्षाही सम्भावित दिसतात.

## प्रकरण ३ रें.

ही इमारत कसली बरें ? कशाकरिता ही भव्य इमारत बान्धली आहे ? कळलें ! ही न्यायाची कचेरी आहे. इथें कायदेकानूंत निष्णात असलेले निःपक्षपाती न्यायाधीश, गुन्हेगार लोकांच्या अपराधाची चौकशी करण्याकरिता बसलेले असतात व ज्याचे हातून अपराध घडला असेल त्याना कडक शासन करीत असतात अहाहा ! धन्य ही विभूति ! ह्या विभूतीच्या योगानें जगात अपराधांना आळा बसतो व न्यायाची प्रस्थापना होते. ज्या ज्या वेळी न्यायाचें निर्मूलन होतें व अन्यायाला ऊत येतो त्या त्या वेळीं मी अवतार घेतो असें श्रीकृष्णानें भगवद्गीतेंत सांगितलेलें आहे. खरोखर हाच तो श्रीकृष्णाचा अवतार ! हीच ती भगवद्गीतेंत वचन दिलेली मूर्ति ! पण हे श्रीकृष्णापेक्षांही ही मूर्ति ज्यास्त सन्माननीय दिसते. श्रीकृष्ण युगान्तरात एकदा कोठें अवतार घेतो, पण अकराला ठोका पडायचा अवकाश की भराभर जेवण आटपून ही मूर्ति कोर्टात अवतीर्ण होते. श्रीकृष्णाचें सगळें " नाटपेट " काम ! एकाही अवताराबद्दल त्याला कधी पगार मिळाला असेल तर शपथ ! पण ह्या न्यायमूर्तीला दरमहाचे दरमहा हजारो रुपयांच्या तनख्या सुरू ! गोपीगीत सुरू होवोत किंवा न होवोत, श्रीकृष्णाचा अवतार अचूक व्हायचा, पण रुपयाचा छन्छन् आवाज निघाल्याशिवाय हे न्यायमूर्ति कोर्टाकडे ढुंकूनही बघायचे नाहीत तेव्हा ह्या न्यायमूर्तीच पुढें कुणीकडे श्रीकृष्ण हेंच खरें नाहीं तर काय ?

आणि हे कोण ? हा ! हे पोलीस ! न्यायखात्याचे साहाय्यकारी ! पोलीसखात्यानें गुन्हेगाराला पकडावें त्या वेळी न्यायखात्यानें

त्यास शिक्षा करावी ! पोलीसाना काय ही अन्यायाची चीड ! ह्याच्यापुढे एक चोर फिरकायचा नाही की एक खुनी पसार व्हायचा नाही ! कुणीं घरफोडी केली की तिथें हे पोलीस हजर, कुणी कुणाचा खिसा कातरला कीं तिथे हे पोलीस हजर, कुणी एखाद्याची पेटी लाम्बविली कीं तिथे हे पोलीस हजर, कुणी खोटीं वजनें ठेवलीं कीं तिथें हे पोलीस हजर, कुणी खोटे कागद केले की तिथें हे पोलीस हजर, कुणी खोटीं नाणी पाडलीं की तिथे हे पोलीस हजर, एवढेंच काय, कुणीं गुप्त व्याभिचार केले तरी तिथें हे पोलीस हजर ! खरोखर हे पोलीस ह्मणजे न्यायाचा स्पेशल अवतार ! न्यायमूर्तिसुद्धा त्याचेवर अवलम्बून! ज्याप्रमाणे एखादी मांजी अंधारात बसलेली असली ह्मणजे तिच्या नजरेतून एकही उन्दीर जायचा नाही त्याप्रमाणे हे पोलीस एखाद्या ठिकाणी नजर लावून बसले ह्मणजे एकही गुन्हा त्याचेपुढे छपून रहायचा नाही

ह्या पोलीसाचे गराड्यात हा थाटमाट केलेला माणूस कोण तर ? काय हा त्याचा शृंगार? ह्यानें इकडे मान वळवली की खुळ्ळ् इकडे मान वळवली कीं खुळ्ळ् ! काय हा आवाज ! हा आवाज ऐकला की एखाद्या राजाच्या राणीचेही ह्या शृंगारावर मन जाईल व ती हा शृंगार मला हवा असें ह्मणेल ! पण—पण हा शृंगार सोन्याचा नाहीं. हा शृंगार लोखण्डाचा आहे. हा राणीकरिता केलेला नाही, तर जे पातकी लोक दुसऱ्याचे गुन्हे करून आपलें पोट भरतात त्यांचेकरिता हा केलेला आहे. हा ह्या माणसाचे अंगावर घालायचें कारण असें कीं हाच तो गुन्हेगार कीं ज्याचेकरिता न्यायमूर्ति बरो-

बर अकरा वाजता कोर्टात आले व ज्याचेकरिता इतके पोलीस न्यायकचेरीत जमले! हा न्यायमूर्तींचे बरोबर उभा राहिला त्यामुळें न्यायमूर्ति कोण व चोर कोण हें नीट समजत नव्हतें! पण ह्या लोखण्डी शृंगारावरून निकाल लागला कीं जो लोखण्डी शृंगार घातलेला तो तो चोर व जो महिन्याचे महिना रुपये वाजवून घेणारा तो न्यायाधीश!

न्यायकोर्टात रोज असे किती खटले येतात बरं? रोज पाचसहा खटले येतात. त्यावरूनच सिद्ध होतें कीं ह्या शहरात रोज पाचसहा लोक गुन्हे करतात. ह्या शहराची लोकसंख्या किती आहे? आहे साठ हजार! ह्मणजे साठ हजारात सहा चोर एवढें प्रमाण पडलें. साठ हजारात सहा, ह्मणजे दर हजारीं एक चोर पडला. आता हजारीं एक मनुष्य चोर असणं ह्मणजे काहीं फार नाहीं, किंबहुना एक हजारात एक मनुष्य चोर असल्याबद्दल दुःख करण्याचे ऐवजी बाकीचीं ९९९ मनुष्यें प्रमाणिक असल्याबद्दल आनन्दच वाटला पाहिजे. हजारातलीं ९९९ मनुष्यें जिथ प्रामाणिक, तो समाज किती धन्य! खरोखर रामराज्यच तें!

आपल्यामध्ये आकडे माण्डण्याची अगदी उलट रीत आहे. वरील उदाहरणच घ्या. कुणीही ह्या उदाहरणाचे आंकडे हजार माणसात एक चोर असें माण्डील, पण तसें करणें अगदी चुकीचें आहे. तसें करणें म्हणजे विनाकारण भीति उत्पन्न करण्याजोगें आहे! त्यामुळें समाजातलीं माणसें विनाकारण भेदरून

जातात व नायकामुळाची गाबरगुण्डी वळते ! असल्या आकड्यांनी मुम्बईतल्या पठाणाप्रमाणें प्रत्येकाला सहा चोर स्वप्नात दिसतात व त्याला भीतीनें घाम सुटतो ! त्यापेक्षा आपल्या गावात एका हजारात ९९९ साव आहेत असे म्हणण्यानें किती चागला परिणाम होतो ! प्रत्येकाला सुरक्षितपणा वाटायला लागतो व कामधन्द्याला हौस वाटते ! पण असे सगळ आकडे कुणी माण्डायचे नाहींत जेवढे अर्थशास्त्रज्ञ तेवढे सारे उलटे आकडे माण्डीत असायचे ! उलटे आकडे हे केवळ ज्योतिषातच असतात असे नाही अर्थशास्त्र, समाजशास्त्र व सरकारी रिपोर्ट ह्यातले सारे आकडे नेहमी उलटे !

प्लेगमध्ये खरा कहर कोण उडवितो ? प्लेग ? हे मुळीच नाही. मग कोण ? तर उलटे आकडे ! ज्यावेळी गावात प्लेग सुरु होतो त्यावेळी म्युनिसिपालिटीचे पत्रकावर " आजचे मरण " ३० असे प्रसिद्ध होतें किती उलट्या काळजाचा प्रकार हा ! प्लेगमध्ये लोकाना जरी इतर कुणीही मारलें नाही तरी ह्या उलटी पद्धति त्याना खास मारते आज गावातले ३० लोक मेले हे सागण्यात फायदा कोणता ? त्यात तुह्मी काय मिळविलें ? त्या तिसापैकी एका-तरी मनुष्याला तुह्मी जिवन्त केलें काय ? नाही. उलट इतर लोकाना मात्र तुह्मी घाबरविलेंत त्यापेक्षा ६० हजारातून हे ३० वजा करून म्युनिसिपालिटीच्या दारावर ५९९७० असा भरभक्कम आकडा ठोबळ अक्षरात लिहीत जा, ह्मणजे गावात ५९९७० लोक जिवन्त असल्याबद्दल वाचणाऱ्याला आनन्द होईल व ३० ह्या भीतिप्रद आंकड्यानें त्याची जी गाळण उडायची ती बन्द होईल

तेव्हा आपण कोणता आंकडा लक्ष्यात ठेवावयाचा ? ९९९ हा ! न्यायाची कोर्टें, न्यायप्रिय न्यायमूर्तींचें ११ वाजता येणें

न्यायप्रयत्नी पोलीसाचा वोळका व देहावर लोखण्डी न्यायालकार वागविणारा गुन्हेगार हे सर्व असे सिद्ध करतात कीं हजारातलीं ९९० माणसे प्रामाणिक आहेत खरोखर प्रामाणिक लोकाची काय ही गर्दी ! सदर्न मराठा रेल्वेच्या डब्यातील रेचारेचच ही ! इतक्या प्रामाणिक लोकाकरिता स्वर्गात फारच ऐसपैस जागा तयार करावी लागत असेल ! किंबहुना मुम्बईतल्या डेव्हेलपमेण्ट खात्या-प्रमाणे स्वर्गातहि एखादे डेव्हेलपमेंट खातें सुरू करून इतक्या प्रामाणिक लोकाकरिता नवे रस्ते व नव्या चाळी बाधाव्या लागत असतील !

परन्तु जगातल्या हजार माणसापैकी ९९० माणसें जर प्रामाणिक, तर मग जगातला प्रत्येक मनुष्य चोर कसा ? ही दोन्ही विधाने खरी असणे शक्य नाही त्यापैकी कोणतें तरी एक खरे व दुसरे खोटें असले पाहिजे. वस्तुस्थितीच्या नदीचा प्रवाह असा आडवा तिडवा खास नसेल कीं ज्याला वाटेत एकदा सत्याचें व एकदा असत्याचे बन्दर लागेल खरोखर जगातल्या १००० लोकापैकी ९९९ माणसे जर प्रामाणिक असलीं तर त्याना चोर म्हणायची चोरीच ! उलट जगातला प्रत्येक मनुष्य जर चोर असेल तर त्याला प्रामाणिक म्हटल्याबद्दल तो बेअब्रूची फिर्याद केल्यावाचून राहणार नाही. मोठी पंचाइतच आली म्हणायची !

---

प्रकरण ३ रें

( १ ) शहरात जे रोजच्या गुन्ह्याचे प्रमाण पडते त्यावरून समाजात गुन्हेगार लोक फारच थोडे असल्याचें दिसून येते.

( २ ) "प्रत्येक मनुष्य चोर आहे" ह्या सिद्धाताशीं हे प्रमाण जमत नाहीं.

( ३ ) जगांत आकडे माण्डण्याची पद्धति अगदी उलट आहे. ही पद्धति बदलायला पाहिजे.

# प्रकरण ४ थें.

—:०:—

## बाळू, असें सांग अं !



आता विनोदाच्या प्रांन्तातून आपण कांहीं वेळ गम्भीरतेच्या प्रान्तात शिरूं आणि आतापर्यन्त जे आपण पर्यालोचन केले त्याचा विचार करूं, जगात वाईट आणि चांगले, खरे आणि खोटें, पाप आणि पुण्य ह्यांची इतकी चमत्कारिक भेसळ झालेली आहे कीं तिच्यामुळें आपणापुढें आलेले दोन्ही सिद्धान्त निरनिराळ्या दृष्टींनीं खरे ठरतात. जगात खरे पापी खरोखरच फार थोडें ह्मणजे हजारात एक किंवा दहा हजारात एक ह्या प्रमाणात आहेत आणि जगात खरे सत्यवान् लोकही तितकेच दुर्मिळ आहेत. सत्यवान् लोकांची दुर्मिळता नजरेपुढें ठेवली ह्मणजे दुनियेंतला प्रत्येक मनुष्य चोर आहे असें वाटायला लागतें पण खरा दुष्ट मनुष्य तितकाच दुर्मिळ आहे हें पाहिलें ह्मणजे समाजातली दर हजारीं ९९९ माणसें प्रामाणिक आहेत हें कबूल करावें लागतें. तेव्हा मागील प्रकरणातून परस्परविरुद्ध अशीं जीं दोन अनुमानें आपणांपुढें आली, त्यात विनोद फार थोडा आहे हें आपणास दिसून येईल. तें सर्व सत्यकथन आहे. ते एकाच सत्य सिद्धान्ताचे दोन निरनिराळे दृष्टिकोन आहेत.

हरिश्चन्द्राच्या वेळेपर्यन्त जे कोट्यवधि मनुष्यप्राणि जगांत होऊन गेले त्यांत हरिश्चन्द्राचीच एवढी प्रख्याति कां आली ! त्याचें कारण एवढेंच कीं त्या सर्वांत हरिश्चन्द्र हा एकटाच सत्यप्रिय मनुष्य होता व बाकीचीं सर्व मनुष्यें खोटें बोलणारीं ऊर्फ लबाड ऊर्फ चोर होतीं. हरिश्चन्द्र जागृतींत तर कधीं खोटें बोलला नाहींच पण स्वप्नांतसुद्धां तो कधीं खोटें बोलला नाहीं. बरें, हरिश्चन्द्राच्या वेळेपासून ह्या स्थितींत काहीं पालट पडलेला आहे ह्मणावें तर तसेंही नाहीं. कारण ह्या स्थितींत जर विशेष काहीं पालट पडला असता तर हरिश्चन्द्राचें नाव आज लुप्त होऊन गेलें नसतें. पण तें लुप्त होऊन गेलेलें नाहीं, एवढेंच नाहीं, तर त्याला फारसे जोडीदारही उत्पन्न झालेले दिसत नाहींत. मनुष्यप्राण्यांत अनुकरणाची व चढाओढीची एवढी हाव आढळून येते कीं लिप्टन्स टीची “ चहा ” झाल्याबरोबर बाजारात कॅप्टन्स टी विकायला येतो व माणेकिया ब्रदर्सनीं दुकान थाटल्याबरोबर काणेकिया ब्रदर्स त्याच्या शेजारीं येऊन बसतात. पण ही अनुकरणेच्छा सर्व इतर कामांत दिसून येते. सत्यप्रियतेचे बाबतींत ही अनुकरणेच्छा दिसत नाहीं. हरिश्चन्द्रास इंग्रज राज्यकर्त्यांप्रमाणें व्यापारी पेढी स्थापावयाची नव्हती त्यास नाइलाज आहे, पण जर का त्यानें सत्याची पेढी स्थापली असती तर त्यास एकही पेढीवाला “ काम्पीटीटर ” ह्मणून उभा राहिला नसता, इतकेंच काय पण व्यापारी लोकानीं त्यास आपण होऊन “ मोनॉपली ” दिली असती. व्यापारी वर्गास निसर्गतःच सत्याचें वावडें आहे. त्यांतही जर एखादा व्यापारी राज्यकर्ता बनला

तर मग बोलायलाच नको. सत्याचें आणि त्याचे सन्मान जमायचे नाहीं. हरिश्चन्द्राने स्वप्नात दिलेलें अभिवचन खरें करून दाखविलें, पण क्लाइव्हसारखे असे कांहीं वस्ताद लोक होऊन गेले आहेत की दिलेली अभिवचने त्यानी स्वप्नातही खरी केली नाहीत.

ह्यावरून जगात सत्य किती दुर्मिळ आहे हे दिसून येते धर्मराजाचे कथेवरूनही हीच गोष्ट प्रत्ययास येणारी आहे हरिश्चन्द्रा प्रमाणें धर्मराजाचे अंगीही सत्यप्रियता होती आजन्म खोटें बोलायचें नाही असा त्याचा निश्चय होता व ह्या निश्चयाप्रमाणें तो बरीच वर्षे वागतही असे पण त्याचा निश्चय अखेरपर्यन्त तडीस गेला नाही. एके प्रसंगी आपला सत्यतेचा बाणा कायम राखायचा की द्रोणाचार्यांचे तावडींतून आपलें सैन्य बचावून न्यायचें हा प्रश्न त्याचेपुढे उभा राहिला व सत्य गारद झाले तरी बेहेत्तर पण सैन्य गारद होऊन द्यायचे नाही असाच त्याने निर्णय केला आपल्या मुलाबाळाचा, कुळाचा व आपल्या तर्फे हातावर शीर घेऊन लढणाऱ्या लोकाचा बचाव ही गोष्ट त्यास सत्याच्या रक्षणापेक्षा ज्यास्त महत्वाची वाटली व त्या मोहास तो बळी पडला ह्या प्रसंगी जर हरिश्चन्द्र असता तर त्यानें काय केले असतें हा एक विचार करण्याजोगा प्रश्न आहे. कारण हरिश्चन्द्रानें जें सत्यरक्षण केले त्यात फक्त त्याचें स्वतःचे हिताहित होते, स्वपक्षीय लोकाच्या बचावाचा त्यात कांहींही सम्बन्ध नव्हता. हा प्रसंग जर हरिश्चन्द्रावर आला असता तर त्याचेंही सत्य लटपटलें असतें कीं काय हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. पण त्याचा निर्णय करण्याचे ऐवजी आपण

संशयाचा फायदा " आरोपी " स देऊं व हरिश्चन्द्राशिवाय सत्यवान् पुरुष दुसरा कोणी झाला नाही ह्या मुख्य अनुमानावर येऊं.

सध्याही महात्मा गांधींची सत्यतेबद्दल जी प्रसिद्धि आहे ती अशीच विवादकारक आहे ह्या सत्यतेबद्दल कोणीही संशय घेत नाही त्यांना तुरुंगात टाकणारे इंग्रज सरकारही त्यांची सत्यप्रियता कबूल करते पण ही सत्यप्रियता कबूल करणे ह्मणजे एके प्रकारे त्यांच्याशिवाय आपण सारे असत्य बोलणारे आहोत असेंच कबूल करण्याजोगे आहे ही कबुली अशा निष्ठुर शब्दात आपण विचारायला गेलो तर कुणी कबुलीजबाबाप्रमाणे कदाचित् हीही माघारी घेतली असती पण गांधींच्या स्तुतीत ती शर्करावगुण्ठित केली ह्मणजे मात्र ती कुणासही जाचक वाटत नाही गान्धींचे सर्व मित्र, अनुयायी व भक्त ही कबुली गांधीस्तुतीच्या रूपाने सन्तोषाने देतच असतात, पण आश्चर्याची गोष्ट ही की गांधींच्या शत्रूनाही ही कबुली देण्यात आनन्द वाटतो त्यांच्या हे लक्ष्यात येत नाही की गांधी सत्यवक्ते आहेत हे जाहीर करण्यानें आपण खोटे बोलणारे आहोत हा डांगोरा आपल्या तोण्डाने ते पिटीत असतात

सत्यतेचे पीक जगात इतकें थोडें येते याबद्दल पुष्कळांस आश्चर्य वाटेल पण हा सिद्धान्त इतक्या निरनिराळ्या प्रमाणानी सिद्ध करता येण्याजोगा आहे की तो कबूल केल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. 'जगांतील प्रत्येक मनुष्य चोर आहे' हें विधान आता कोणासही मन्थरेच्या आवेशानें व मन्थरेच्याच पुनरुक्तीनें करता येईल

व तें केल्यास स्वतःशीं सन्तापानें हात चोळण्यापलीकडे कुणालाही त्याचा प्रतिकार करतां यायचा नाही. कोणी कितीही विद्वान् असो, कोणी केवढाही सम्पत्तिमान् असो, कोणी केवढाही धन्देवाला असो कोणी केवढ्याही मोठ्या अधिकारावर असो, कोणी केवढाही लौकिकवान् असो, त्याचे देखत व त्यास न जुमानता असें स्पष्टपणें म्हणतां येईल की ह्या जगातील प्रत्येक मनुष्य चोर आहे हे विधान जास्त टासून करण्याचें कारण एवढेच की मनुष्यानी आजपर्यन्त इतर गोष्टींची तर चोरी केलेलीच आहे, पण जगातील प्रत्येक व्यक्ति चोर आहे ही गोष्टही त्यांनी इतकी चोरून ठेवलेली आहे की ती तोंडावाटे काढण्याची कुणाची प्राज्ञा नाहीं. जगातील एक मनुष्य दुसऱ्यास भेटला म्हणजे ते दोघेही "चोर" ही गोष्ट लपवून ठेवतात व ढोंगीपणाने एक दुसऱ्याची परस्पर तारीफ करायला लागतो. जणूं काही दोन्ही हरिश्चन्द्राचेच अवतार!

बरें! जगांत सत्याचा एवढा खसखडाट व्हायला कारण म्हणाल तर तसें मोठेसें कारणही दिसत नाहीं. कारण मनुष्याला बालपणापासून जर एखाद्या गोष्टीचा उपदेश चालत असेल तर तो सत्याचाच होय. "सत्यं वद, धर्मं चर" ही पूर्वीची "संस्कृत" कालातील "शिक्षा" झाली, पण "संस्कृत" काल जाऊन "मराठी" काल आला म्हणून त्या शिक्षणांत अन्तर पडलेले आहे असें मुळींच नाही. "जगी सत्य बोला" असाच उपदेश आताही चाललेला आहे.

सत्य सदा बोलावें
सांग गुरु आणि आपुला बाप
खोटें भाषण करणें
सज्जन ह्मणतात हें महापाप

ही कविता कांहीं कालापूर्वी मराठी क्रमिक पुस्तकांत असे व अजूनही तशीच असण्याचा संभव आहे. ह्या कवितेंत असे स्पष्ट सांगितलेलें आहे कीं शाळेंतून शिक्षक व घरींदारीं बाप मुलाना एकसारखे पढवीत असतात कीं मुलनो, नेहमीं सत्य भाषण करीत जा. पण एकही मुलगा त्याप्रमाणे चालत असेल तर शपथ! कारण त्याला माहीत असतें कीं ज्या वेळीं शिक्षक व बाप हा उपदेश करीत असतात त्याच वेळीं ते नुकतेच कांहींतरी क्षुल्लक कामाकरिता खोटें बोललेले असतात. मग हा उपदेश मुलाच्या मनावर ठसावा कसा? एवढें बरें आहे कीं ज्या वेळीं वरील उपदेश गुरु व बाप ह्याचेकडून त्याना करण्यांत येतो त्या वेळीं लगेच बापाला उलटून तीं असे म्हणत नाहींत कीं 'बापहो,' आम्हास सत्याचा उपदेश करण्याचे पूर्वीं मेहेरबानी करून तुम्ही खोटें बोलणे सोडून द्याल काय?

कारण मुलें खोटें बोलायला कशीं शिकतात? त्यांची ती कांहीं करामत नसते. हें सर्व शिक्षण तीं आपल्या वाडवडिलाकडून घेत असतात. ज्या वेळीं दुपारच्या वेळीं बाप उपरणें घेऊन निजतो आणि मुलाला सांगतो कीं 'बाळू, कुणी आलें तर मी बाहेर गेलों आहे असें सांग,' त्या वेळीं मुलाना खोटें बोलण्यातला पहिला धडा

मिळतो व त्यावर स्वतःची बुद्धि चालवून उत्तरोत्तर ती बापसे बेटा सवाई बनतात. खोटेपणाचे गृहशिक्षणच जर ह्याप्रमाणें मिळत असते तर मुलें सत्यवादी व्हावी कशी व "सत्य सदा बोलावें" हा आईबापाचा उपदेश त्याना मनःपूर्वक वाटावा कसा ? त्याना हा सर्व पोरखेळ वाटतो व खोटें बोलण्याची त्याना उत्तरोत्तर दिक्कत वाटेनाशी होते. खोटेपणाचे जेथे बाळकडू, तेथे ह्यापेक्षा निराळा परिणाम काय होणार ?

---

**प्रकरण ४ थे.**

( १ ) सत्यप्रियतेबद्दल पूर्वी हरिश्चन्द्र प्रसिद्ध होता व नव्हे त्याची प्रसिद्धि कायम आहे. ह्यावरून सत्यनिष्ठ लोकांचे प्रमाण हरिश्चन्द्राचे वेळेपासून आहे तेच आहे असे सिद्ध होते.

( २ ) मनुष्य प्राणी स्पर्धाप्रिय आहे. पण प्रामाणिकपणाचे गुणातमात्र माणसे एकमेकाशीं चढाओढ करताना आढळत नाहींत.

( ३ ) उलट धर्मराजासारखे सत्यनिष्ठ पुरुषही क्वचित् प्रसंगी व्रतापासून ढळलेले दिसतात.

( ४ ) गान्धींची सत्यतेबद्दलची प्रसिद्धि हें सुद्धा जगात सर्वत्र असत्यता असल्याबद्दलचेंच एक प्रमाण आहे.

( ५ ) लहानपणापासून प्रत्येक मुलास वडील माणसाकडून सत्याबद्दलचा उपदेश होत असतो पण खुद्द वडील माणसेच असत्य वर्तन करून तो उपदेश निरर्थक करतात.

( ६ ) मुले खोटें बोलण्याचें शिक्षण अपल्या आईबापाकडूनच घेत असतात.

# प्रकरण ५ वें.

## जिथें तिथें हीच रडकथा '



म्हणून कुणाला सांगितलें तर राग येईल, पण खरे पाहूं गेलें असता ह्या जगांतील प्रत्येक मनुष्य चोर आहे वरील वाक्य वाचून आता वाचकवर्गात खळबळ उडणार नाही व कोणी आम्हाला खायलाही उठणार नाही प्रत्येकमनुष्य चोर आहे हा आरोप आम्ही काही चोरटेपणानें करीत नाही अगदी उघडपणे करतो खरे बोलायचे त्यात चोरी कसली ?

बाकी हें वाक्य आम्ही जितक्या सहजपणाने उच्चारलें तितकें तें सोपे नाही. ह्या जगात जर एखाद्या गोष्टीची चोरी असली तर ती खरें बोलण्याचीच आहे इतर गोष्टीची काही तितकी चोरी नाही.

कोणताही समाज घ्या. त्यात केवढाले गुन्हे केलेले लोक खुशाल वावरत असतात' त्यापैकी शेंकडा नव्वद लोकांना अगोदर काहींच शासन होत नाही, आणि ज्या शेंकडा दहा लोकाना शिक्षा होत असते त्यापैकी बहुतेक पुन्हा समाजात साळसूदपणानें येऊन मिसळतात.

समाज, सरकार किंवा धन्देवाले लोक हे ज्याना कधीही क्षमा करीत नाहींत असे लोक ह्मणजे खरे बोलणारे तेवढेच होत. ह्या

अभागी लोकांनामात्र अजूनपर्यन्त जगानें कधींही क्षमा केलेली नाहीं.

जगाचा बहुतेक इतिहास कसा आहे ? असाच आहे. सत्यप्रिय लोकांच्या रक्तानेंच बहुतेक इतिहास माखलेला आहे. बहुतेक इतिहासांत हीच रडकथा—कीं अप्रामाणिक लोकांची चलती झाली व प्रामाणिक लोकांची कत्तल उडाली.

पुन्हां आपण हरिश्चन्द्राचेंच उदाहरण घेऊं. हरिश्चन्द्रानें सत्य गाजविलें—हरिश्चन्द्रानें स्वप्नातील वचनेंही सत्य केलीं. पण ह्या सत्यप्रियतेबद्दल त्यास काय बक्षीस मिळालें ? कसलें बक्षीस ? क्लेश, अपमान व आपल्या समक्ष आपल्या प्रिय पत्नीचा व लेकराचा छळ, हेंच बक्षीस, दुसरें काय ?

तो सत्य बोलला ह्मणूनच राज्यास मुकला. तो सत्य बोलला म्हणूनच अनवाणी भटकण्याचा त्यास प्रसंग आला. तो सत्य बोलला, म्हणूनच त्याचा आणि त्याच्या बायकामुलाचा लिलांव झाला. तो सत्य बोलला म्हणूनच मुलाचा मृत्यु व पत्नीची आर्तवाणी त्यास ऐकणें प्राप्त झालें. जर तो सत्य बोलला नसता तर ह्यापैकीं कांहींही प्रसंग त्याचेवर ओढवला नसता.

अशी कल्पना करा कीं हरिश्चन्द्राचे जागीं विसाव्या शतकांतील एखादा मनुष्य असता व त्यानें जर स्वप्नात एखाद्यास वचन दिलें असतें तर त्यानें काय केलें असतें ? तो सत्यवादी असता तरी त्यानें असें सरळ सांगितलें असतें कीं मीं तुला स्वप्नांत राज्य द्यायचें वचन दिलें ही गोष्ट खरी आहे, आणि तें राज्य मी तुला स्वप्नांत द्यायला

तयार आहें. माझ्या राज्यावर तू स्वप्नात खुशाल बैस. स्वप्नात त्याचा तूं खुशाल उपभोग घे. जागृत सृष्टीत मात्र तुला माझ्या राज्यांतली एक तनसडीही मिळायची नाहीं. स्वप्नसृष्टि निराळी व जागृत सृष्टि निराळी. स्वप्नसृष्टींतलि वचनें स्वप्नसृष्टींत पुरीं करून घे जागृत सृष्टीशीं मात्र त्याचा काहींएक सम्बध नाहीं.

स्वप्नात दिलेल्या वचनाबद्दल विसाव्या शतकांतील प्रामाणिक मनुष्य सुद्धां हरिश्चन्द्राइतका त्रास करून घेईल काय ? मुळींच नाहीं. आणि इतका त्रास तो न करून घेईल तरी त्यास कुणी नाते ठेवणार नाहीं. कारण स्वप्नात दिलेलीं वचनें खरीं करणें भाग आहे ही कल्पनाच विसाव्ये शतकास उपहासास्पद आहे. ही झाली ह्या शतकातील प्रामाणिक मनुष्याची गोष्ट ! अप्रामाणिक मनुष्याचें तर नावच काढायला नको. विसाव्या शतकातील अप्रामाणिक मनुष्यें अगदीच गम्भीर आहेत. आम्हीं मागें ह्मटल्याप्रमाणें हीं माणसें अशीं आहेत कीं जागृतींत दिलेलीं वचनें स्वप्नातसुद्धा खरीं करायचीं नाहींत.

हरिश्चन्द्राचा अखेर जय झाला व त्याचें राज्य त्यास परत मिळालें. पण तें केव्हा ? तर अनन्वित छळ सोसल्यानंतर ! आणि तेंही खुद्द शंकर त्यास तारायला अवतरले ह्मणून ! त्या वेळीं जर शंकर अवतरले नसते तर हरिश्चन्द्राचा त्या क्षणीं लय झाला असता.

ह्यावरून काय सिद्ध होते ? हेच कीं ह्या जगांत सत्याचा कुणीही वाली नाहीं. सत्याचे नशींबी क्लेश व लाथाच ! त्याला तारायला ईश्वरच अवतार घेईल तर घेईल. खुद्द सत्याचें अंगांत स्वतःचें

तारण करायची ताकद नाही. ते दुसऱ्याचे पायाखालीं चिरडून गेलेंच पाहिजे.

बरें. सत्याचा शेवटी जय आला तरी त्यात काय महत्त्व ? कांही नाही प्रथम पराभव आणि शेवटी जय ही सत्याची स्थिति व प्रथम जय आणि शेवटी अपयश ही असत्याची स्थिति ! मिळून गोळाबेरीज एकच !

हे समीकरण माण्डायचे ह्मणजे असे माण्डता येईल—

**प्रथम पराभव + अन्ती जय = सत्य**

**प्रथम जय + अन्ती पराभव = असत्य**

अर्थात्च

**प्रथम पराभव + अन्ती जय = प्रथम जय + अन्ती पराभव**

आणि ह्मणून

**सत्य = असत्य**

व

**असत्य = सत्य**

ह्मणजे तात्पर्य काय ? की सत्य आणि असत्य ह्यांचा किंमत एकच ! एकांत प्रथम पराभव व अन्ती जय व दुसऱ्यात प्रथम जय व अन्ती पराभव ! दोहोंत अनुक्रमाचा काय तो फरक, पण पराभवाचा डाग सत्य आणि असत्य ह्या दोहोंनाही सारखाच ! सत्य झालें तरी त्याचा पराभव व्हावयाचाच ! पराभवातून तें सुटायचे नाहीं.

## प्रकरण ५ वे.

कित्येक लोक तर ह्या दृष्टीने असत्याचाच स्वीकार करतात कारण असत्य ह्मटले की सर्व आयुष्यभर चैन व सुख उपभोगायला सापडते पण सत्याचा सारा जन्म कष्टात जाऊन शेवटी सुखाचे काही क्षण लाभले तर लाभतात !

शिवाय एक अशी गोष्ट आहे की की जरी सत्याला शेवटी जय मिळाला तरी त्याला प्रथमत भोग वे लागणारे क्लेश इतके प्रखर असतात की त्याची आठवण झाली तरी अगावर काटा उभा राहतो ह्याचे कारण हे आहे की सत्याचा छळ करणारे लोक नीच प्रवृत्तीचे असतात दुसऱ्याचा किती छळ करावा ह्याची त्याना परिमिति नसते. दुसऱ्याम कितीही छळले तरी त्यांची होरा अपुरीच राहते असत्याचा तितका छळ कधीही होत नाही असत्याचा पराभव करणारे पुरुष दिलदार व उदार असतात असत्याचा पराभव करून ते त्यास सोडून देतात दुसऱ्याचा छळ करण्याची कल्पना त्याच्या स्वप्नातही येत नाही

दुर्योधनाने द्रौपदीचा किती छळ केला ! काय तो उन्माद व काय तो अघोरी प्रयत्न ! द्रौपदीवरचा प्रसग द्रौपदीनेच सहन करावा ! इतर स्त्रियांना तिच्या शतांशानेही छळ सहन करता आला नाही

पण पाण्डवाचा ज्या वेळी पराभव झाला त्या वेळी त्याच्यावर हा काय एकच प्रसंग आला ? नाही. एकापेक्षां एक असे दुस्तर प्रसंग त्याचेवर आले व ते सर्व त्यानी निमूटपणे सहन केले. कौरव नीच होते. ते छळ करण्याच्या रोज नव्या नव्या युक्त्या काढीत असत. पाण्डवाचा कितीही छळ केला तरी त्यांच्या जिवाचें समाधान होत नसे.

परन्तु ज्या वेळीं बाजू उलटली व पाडवाच्या पुढें कौरवाना हार खावी लागली, त्या वेळीं काय झाले ? पाडवाच्या एका शतांशाने त्याना छळ सहन करावा लागला नाही. त्याचा छळ होणार कसा ? त्याचे शत्रु म्हणजे धर्म, श्रीकृष्ण किंवा अर्जुन ! पण ज्य नीचपणाच्या गोष्टी कौरवानीं पाण्डवाचेविषयी केल्या त्या नीचपणाच्या गोष्टी ह्यांचे हातून कौरवाविषयीं घडणे कधीतरी शक्य होते काय ?

सत्याच्या नशीबान छळ ठेवलेलाच आहे सत्यास जितका छळ सोसावा लागतो तितका असत्याला सहन करावा लागत नाहीं. छळाचे बाबतींत असत्याची बाजू सुखाची आहे. सुख पाहिजे असेल तर असत्याचेच बाजूस उभे राहिले पाहिजे सत्याचे बाजूस उभें राहिलें की दुःख ! मृत्यूपेक्षाही दुर्धर दुःख ! खरोखर त्या दुःखापेक्षा मृत्यु शतश. बरा !

समीकरणाच्या दृष्टीनें पाहिलें ह्मणजे जय व पराभव ह्यांची बेरीज सारखी येते व सत्य आणि असत्य सारख्याच योग्यतेचीं ठरतात. पण छळाची आठवण झाली, ह्मणजे सत्याची फार भीति वाटते आणि असें होतें कीं नको तें सत्य ! क्लेशाच्या तव्यावर शरीराला तळून काढणाऱ्या सत्यापेक्षा सुखाचा वारा अंगा लागूं देणारें असत्यच बरें !

सर्व इतिहास सत्याच्या रक्तानें माखलेला आहे. सत्याच्या रक्तानें सर्व इतिहास पाघळत आह, निथळत आहे, ठिपकत आहे. सत्याच्या अंगांतून निघालेल्या ह्या रक्ताच्या चिळकाण्ड्या पाहून

सत्याची थोरवी कुणाला वाटेल ? कोणी त्याचशा सांवलीखालीं उभा राहील काय ? छे:, सत्यापेक्षां असत्यच बरें ! जय–अपजयाची बाजू दोघांत सारखीच—सत्याचे मुळें छळ मात्र अनिवार !

पण इतका छळ सहन केला तरी सत्याचा अखेर जय होणार ही तरी खात्री आहे काय ? नाहीं. ही देखील खात्री नाहीं.

**प्रथम पराभव + अन्तीं जय= सत्य**

हें समीकरणही खरें नाहीं. हें समीकरण खरें असतें तरीही खऱ्याला मरण नव्हतें. मण वस्तुस्थिति तितकीही आशाजनक नाहीं. ह्या जगांत अशीं सहस्त्रावधि उदाहरणें आहेत कीं ज्यांत सत्याचा जय झालेला नाहीं व सत्य छळ, जुलूम व आसुरी सत्ता ह्याचेखालीं दडपून गेलेलें आहे.

---

**प्रकरण ५ वें.**

**( १ ) ह्या जगांत जर एखाद्या गोष्टीची चोरी असेल तर ती खरें बोलण्याची आहे.**

**( २ ) इतर गुन्ह्यांना ह्या जगांत क्षमा होते पण खरें बोलण्याच्या गुन्ह्याला मात्र ह्या जगांत क्षमा होत नाहीं.**

**( ३ ) जगाचा बहुतेक इतिहास सत्यप्रिय लोकांच्या रक्तानें माखलेला आहे. ह्याचें उत्कृष्ट उदाहरण हरिश्चंद्राचें होय. तो सत्य बोलला म्हणूनच राज्यास मुकला.**

(४) सत्याचा शेवटीं जय होतो असे म्हणतात. पण हे खरे असलें तरी ह्यावरून सत्य आणि असत्य सारखेंच ठरते. फक्त असत्याचा प्रथम जय होतो. व सत्याचा शेवटीं जय होतो. त्याचप्रमाणें सत्याचा पराभव प्रथम होतो व असत्याचा पराभव शेवटीं होतो.

(५) पण छळ ही गोष्ट मात्र फक्त सत्यालाच लागू आहे, असत्याला नाहीं. सत्याचा पराभव झाला कीं त्याचा छळ सुरू होतो. असत्याचें तसे नाहीं. असत्याचे शत्रु सत्यवान् असतात. असत्याचा पाडाव झाला तरी ते असत्याला छळ करीत नाहींत.

(६) जय व पराभव ह्या दृष्टाने सत्य आणि असत्य सारख्याच योग्यतेचीं आहेत. पण छळास बळी फक्त सत्यच पडतें, असत्य पडत नाहीं. ह्यामुळें सत्याची फार भीति वाटायला लागते.



# प्रकरण ६ वें.

## " परनार विषाचा प्याला ! "



सत्याचा शेवटी जय होतो अशी सर्व लोकाची प्रचलित समजूत आहे व ह्या समजुतीस अनुसरून सत्याची खूप प्रशंसा लोकात, चाललेली असते. पण लोकाना प्रशंसा करायला काय होते? ह्या प्रशंसेस अनुसरून सत्याचे योगाने कोणाचेही संरक्षण होत नाही. उलट जे वेडे लोक सत्याचे नादी लागतात ते अचूक मरतात !

रामचन्द्राचे कालापूर्वी ऋषींच्या हाडाचे पर्वत पडलेले असत असे म्हणतात हे पर्वत का झालेले होते? रावणाच्या असत्य तत्त्वास ऋषिजन बळी पडले नाहीत म्हणून त्याच्या हाडाचे पर्वत झालेले होते ते पर्वत रावणाने केलेले होते. सत्यप्रिय ऋषि रावणाच्या असत्य मार्गाने चालण्यास कबूल होईनात म्हणून रावणाने त्याना मारुन त्याच्या हाडाचे पर्वत केलेले होते. ऋषि जर रावणाप्रमाणे अप्रामाणिक, असत्यवादी अथवा अनीतिमान् असते तर रावणाचे शस्त्रास ते बळी पडले नसते. ते जर अनीतिमान् असते तर रावणाने आपल्या कृपेखाली त्याना घेतलें असते. ते जर अनीतिमान् असते तर रावणाने त्याना ज्यास्त ज्यास्त मान दिले असतें.

पण तसें झालें नाहीं. रावणाच्या अनीतिमान् इच्छांस त्यांनीं "हांजी, हांजी" केलें नाहीं. रावणानें अनीतिमान् मार्गानें जायची आज्ञा त्याना केल्याबरोबर ते ह्मणाले, नाही, ही गोष्ट आमच्यानें होणार नाहीं, सत्याचे पायीं आमचा प्राण गेला तरी हरकत नाहीं, पण तुमची असत्यमूलक आज्ञा आम्ही ऐकणार नाही.

पण सत्यावरील ह्या प्रेमाचा परिणाम काय झाला ? रावणाने आपली तरवार काढली व त्याची सपासप मुण्डकीं कापली. हे सत्यभक्त आहेत, ह्याना कसें मारूं ? असा क्षणभरही विचार त्यानें केला नाहीं व त्याची सत्यभक्ति त्यांना एक क्षणभरही वाचवूं शकली नाहीं. रावणानें त्यांचा वध केला. रावणाच्या अनुयायांनीं त्याचा वध केला. आणि अशा रीतीनें हाडांचा एक मोठा पर्वत होऊन पडला.

पुढें रामचन्द्रानीं अवतार घेऊन रावणाला मारलें पण तें केव्हा ? तर लक्षावधि ऋषींना सत्याचे पायीं मृत्यु आला तेव्हा. मृत्यूनन्तर ह्याचा काय उपयोग ? सत्याचे लाखो अभिमानी मरून पडल्यानन्तर एका सत्यसंरक्षकानें असत्याचा संहार केला तर त्याचा काय फायदा ? जे लाखों सत्यनिष्ठ मरून जायचे ते गेलेच ! ते मरून जायचे अगोदर जर त्यांच्या संरक्षणार्थ सत्य किंवा सत्यप्रवर्तक श्रीराम आला असता तर सत्याचा शेवटीं तरी जय होतो असें म्हटलें असतें. पण जीव गेला आणि राम आला ह्यांत रामाच्या येण्यांत तरी काय भूषण व सत्याच्या अभिमानापासून तरी कोणता लाभ ? जीव गेल्यानंतर वैद्य येण्यांतलाच हा प्रकार !

## प्रकरण ६ वें.

ज्या ज्या वेळीं असत्य वरचढ झालेलें दिसेल त्या त्या वेळीं मी जन्म घेईन—ह्या श्रीकृष्णाच्या प्रतिज्ञेचा उल्लेख मागें केलेला आहेच, पण ती प्रतिज्ञाही अशीच हास्यास्पद आहे ! तूं खुशाल मर, तुझें श्राद्ध मीं "रेग्युलर्ली" करीन, असल्यापैकींच हें हास्यास्पद आश्वासन ! सबन्ध युगभर असत्य माजावयाचें, सत्यवान् लोकांचा संहार व्हायचा, अनीतिमान् लोकानीं धुमाकूळ घालायचा—आणि मग युगाचे शेवटीं श्रीकृष्णाची स्वारी डुलत डुलत अवतार घेऊन यायची ! अरे, काय हें ! रयतेचे अर्ज १०।१० वर्षें लोळत पडल्यानंतर एकाद्या दिवशीं त्याचा निवाडा करण्याकरिता दरबारांत येऊन बसणाऱ्या खुशालचेण्डू संस्थानिकाची गोष्ट सांगत असतात ! पण श्रीकृष्णाचा वाक्या त्याच्याहीपेक्षा विलक्षण ! कारण एका सबन्ध युगापर्यन्त सत्यवान् लोकाचा सत्यानाश झाल्यानन्तर श्रीकृष्ण यायचे व मग सत्याचें संरक्षण व असत्याला शिक्षा करायला लागायचे !

तेव्हा सत्याचा अखेर जय होतो ही आशाही व्यर्थ आहे. सत्याचा प्रथमही जय होत नाही व अखेरीलाही जय होत नाही. एखादे वेळी चुकूनमाकून त्याचा जय झाला तर नशीब ! बाकीच्या सर्व वेळीं असत्याचा जय ! जेव्हां सत्याचा जय होतो त्या वेळी त्या जयात फारसा जोरही नसतो. खरे जोरदार असत्यच ! ते मात्र नेहमी जोरात असतें. ह्या जगात जे असत्यवादी त्यांचीच भरभराट ! खोट्याचे कपाळीं कुऱ्हाडीचा घाव ही म्हण अगदी खोटी ! खरा घाव सत्याचे कपाळी ! जे लोक सत्याचे नादीं लागतात त्यांची दुर्दशा उडालीच पाहिजे.

शिकन्दर बादशहाने हिन्दुस्थानावर स्वारी केली, त्या वेळी सत्य कुणाचे बाजूस होते ? हिन्दु लोकांचे बाजूस ! तो देश त्यांचा होत। व आपल्या देशाचे सरक्षणार्थ पौरस राजाचे निशाणाखाली ते जमलेले होते. त्याचे विरुद्ध चाल करून येणारा शिकन्दर बादशहा केवळ अन्यायाने व दुसऱ्याना गुलामगिरीत डाम्बण्याच्या दुष्ट इच्छेनें त्याचे विरुद्ध चाल करून येत होता पण परिणाम काय झाला ? सत्यासाठी लढणारे हिन्दु लोक पराभव पावले व असत्याने प्रेरित झालेला शिकन्दर बादशहा विजयी झाला.

गजनीच्या महंमदाने हिन्दुस्थानावर सत्रा स्वाऱ्या केल्या, त्या वेळी सत्य कुणाचे बाजूस होते ? हिन्दु लोकाचे बाजूस ! पण त्याना जय मिळाला काय ? नाही. महंमदाला जय मिळाला. सोमनाथाच्या मूर्तीवर त्याने हल्ला केला तेव्हां जर आकाश कडकडलें असते व महंमदाचा हात लुला पडला असता तर म्हटले असते की सत्याचा शेवटी जय होतो. पण महंमदाचा हात लुला पडला नाही. त्यानें देवावर हात टाकला तेव्हा उलटी देवाचीच मूर्ति फुटली ! जिथें देवाला स्वतःचें सरक्षण करता येत नाहीं तिथे तो सत्याचें संरक्षण काय करणार ?

घोरी आणि पृथ्वीराज ह्यांच्या संग्रामांत पृथ्वीराजाचे बाजूस सत्य नव्हतें असें कोण म्हणेल ? पण हें सत्य पृथ्वीराजास वांचवूं शकलें नाहीं. त्याचा जो त्या वेळीं पराभव झाला तो कायमचा झाला. हिन्दूंचें एकछत्री सिंहासन त्यावेळीं कायमचें गेलें. त्या

वेळेपासून दिल्ली हिन्दु लोकाचे सत्तेवर जी आंचवली ती कायमची आचवली ! पुन्हां ह्मणून दिल्ली हिन्दु साम्राज्याची राजधानी झाली नाहीं.

तालीकोट, पाणिपत वगैरे सर्व संग्रामाचा असाच इतिहास आहे. तो इतिहास वाचला ह्मणजे उद्वेगाने एक दुबळा श्वास सोडणें एवढी एकच गोष्ट आपले हातात राहते व दुसरें काहींच नसतें. सत्याचे सरक्षण ह्या इतिहासात कुठें आहे व परमेश्वर कुठें आहे ?

येशू खिस्त फाशी का गेला बरें ? त्याला जें खरें वाटत असे तें तो बोले ह्मणून तो जर खोटें बोलायला तयार झाला असता तर तो कधींही फाशी गेला नसता.

सॉक्रेटीसला विष प्यावें लागलें तेंही तो खरें बोलत होता ह्यामुळेंच ! त्याला विषापेक्षां त्याचें सत्यच ज्यास्त बाधलें. किम्बहुना सत्याचा विषारीपणा विषारी पेल्याच्या रूपानें त्याच्या अनुभवाला आला.

" परनार विषाचा प्याला " असें एक गीत देवलांनीं आपल्या संशयकल्लोळ नाटकात घातलेलें आहे. पण तें तितकेसें खरें नाहीं. परनार कुणाला बाधलेली आहे ? कुणाला नाहीं. उलट पुनर्विवाह, विवाहनिराकरण इत्यादि भपकेदार नांवांखालीं परनारीचा सम्बन्ध 'फॅशनेबल' समजांत सुधारणा ह्मणून गणला जाण्याचीं शुभ चिन्हें दिसू लागलीं आहेत. मनुष्यसमाज ज्या वेळीं जंगली होता त्या वेळीं तो

जंगली म्हणून मनुष्यांना परनार अग्राह्य नव्हती व आतां माणसें फॅशनेबल झालीं म्हणून परनार अग्राह्य नाहीं. मिळून परनार अग्राह्य मुळींच नाहीं. अशा स्थितींत "परनार विषाचा प्याला" असें कोण म्हणेल?

खरा विषाचा प्याला म्हणजे सत्य. तें तोण्डाला लावायचा अवकाश की मनुष्याचा ताबडतोब प्राण जातो निदान सत्यामुळें मनुष्य दुर्धर संकटाततरी पडतो लो. टिळक सहा वर्षे तुरुंगांत पडले ह्याचें काय कारण? खऱ्या गोष्टी बोलून दाखविण्याचें त्यांनीं धारिष्ट केलें म्हणून! सरकारनें त्यांच्यावर लागू केलेलें कलम कोणतेंही असो, पण खरें पाहतां त्यांच्यावर फक्त पुढील कलम लागू झालेलें होतें:—

> जो कोणी समाज, सावकार किंवा सरकार ह्यांचेविरुद्ध सत्य गोष्टी बोलेल त्यास फांशी, हद्दपारी, बहिष्कार अथवा अशीच एखादी कडक शिक्षा देण्यांत येईल.

तेव्हां ह्या जगांत जर कशाला चोरी असेल तर ती सत्यालाच असल्याचें दिसून येईल. प्रत्येक मनुष्य हा चोर आहे हा सिद्धान्त मांण्डून आम्हीही आज सत्य बोलण्याचा गुन्हा करीत आहों. परन्तु त्याबद्दल आम्हांस शासन करायचे अगोदर एवढें चोरीचें शास्त्र नीट वाचण्याविषयीं आम्ही वाचकांना विनन्ति करीत आहोंत. आम्ही फांशीं

गेलों तरी हरकत नाहीं, पण हें चोरीचें शास्त्र जर नष्ट झालें तर चोरांची–अर्थात् माफ करा, पण तुम्हा सर्वांची–मोठीच गैरसोय होईल.

**प्रकरण ६ वें.**

( १ ) पण सत्याचा शेवटीं जय होतो ही समजूतही खरी नाहीं.

( २ ) सत्याचा प्रथमही जय होत नाहीं व शेवटींही जय होत नाहीं. नेहमीं असत्याचाच जय होत असतो.

( ३ ) जर एखादे वेळीं कधीं सत्याचा जय झालाच तर तो चुकून माकून होतो. सत्याच्या जयात फारसा जोरही नसतो. खरें जोमदार म्हणजे असत्य. तें मात्र नेहमीं जोरावर असतें.

( ४ ) 'खोट्याचे कपाळीं कुऱ्हाडीचा घाव' ही म्हण खोटी आहे. कुऱ्हाडीचा घाव सत्याचे कपाळीं बसतो. संकटाचा व छळाचा मारा फक्त सत्यावर होतो.

( ५ ) रावणानें केलेले ऋषींच्या हाडाचे पर्वत, शिकन्दरानें हिंदुस्थानावर केलेली स्वारी, गजनीच्या महमदानें सोरटी सोमनाथाचा केलेला विध्वंस, घोरी व पृथ्वीराज ह्याच्या संग्रामात पृथ्वीराजाला आलेले अपयश व त्यामुळें दिल्ली येथील हिंदु सत्तेचा कायमचा नाश, तालीकोट आणि पानिपत वगैरे युद्धें, लो. टिळक व म. गान्धी याचा तुरुंगवास— हीं सर्व सिद्ध करतात कीं सत्याला कधींच जय येत नाहीं

( ६ ) येशु खिस्त सत्याचे पायीं फांशीं गेला—सत्याचे पायीं सॉक्रेटीसला विष प्यावें लागलें— हीं उदाहरणें असे दाखवितात कीं मनुष्याची अखेरची घटका आली तरी सत्य त्याचें संरक्षणार्थ धावत नाहीं.

( ७ ) 'मरनार विषाचा प्याला' असें देवलनीं म्हटलें आहे. पण ते खरें नाहीं. खरा विषाचा प्याला सत्य हें आहे. तें मात्र मनुष्याला बाधतें व त्याचा जीव घेतें.

# प्रकरण ७ वें.



## " मला मुम्बईला जायचंय् "






जगात अतिशय मोठा गुन्हा जर कोणता असेल तर तो सत्य हा होय. किम्बहुना सत्य हा एकटाच गुन्हा असा आहे कीं ज्याला हटकून शिक्षा होते. इतर सर्व गुन्हे माफ केले जातात. त्याना कडक शिक्षा नसते. कित्येक वेळा त्यातून मनुष्य अजीबाद सुटतो. काहीं वेळा तर गुन्हे करणाराची तारीफ होते व तो भरभराटीस चढतो.

भरभराट जर होत नसेल तर ती सत्य आचरणाराची होय. सत्य बोलणाऱ्याला व सत्य आचरणाराला नेहमी दारिद्य असायचेंच विदुर कण्या खात असायचा. जनीची झोंपडी असायची. कबिराजवळ वेळेला तान्दुळ मिळणें मुष्किल असायचें. येशू ख्रिस्त पायी चालत असायचा व सॉक्रेटिसाचेजवळ पुरती दिवाबत्ती देखील मिळायची नाहीं.

बुद्धिवान् मनुष्य गरीब असला म्हणजे आपण असें अचूक समजावें की तो सचोटीचा आहे. तो सचोटीचा असल्याशिवाय त्याला गरीबी यायची नाहीं. सचोटी व परीस ह्यांचे परस्परविरुद्ध गुण आहेत. परिसामुळें लोखण्डाचें सोनें होतें. सचोटीचे योगानें

सोन्याचें लोखण्ड होतें. मनुष्य बृहस्पतीसारखा शहाणा असला व इन्द्राच्या सिंहासनावर बसण्यासारखी त्याची योग्यता असली तरी सचोटीमुळे त्याच्या गुणाची माती होऊन जाते.

पण तो लबाडीमध्यें शिरूं द्या कीं त्याचेवर लक्ष्मीनें मेहरनजर केलीच. आपण ज्या मोहोल्यात राहतों त्या मोहोल्यात अतिशय भरभराटीचें दुकान कोणतें बरें ? दारूचें. अंगावर सोन्यामोत्यांचे दागिने घालून सन्ध्याकाळी थाटानें देवदर्शनाला कोण निघते ? वेश्या पण जी पतिव्रता असते ती भाकरी बडवीत असायची अथवा मुलाचे अंगावर अंगडीटोपडीं चढविण्याखाली तिचे रट्टे निघायचें ! तिला दागिने कुठले ?

एखादा पदवीधर घ्या व दुध विकणारा एखादा पुरभय्या घ्या. पदवीधराला पदवी प्राप्त करून घेईपर्यन्त २०००।३००० रु. खर्च आलेला असतो पण त्याला नोकरी मिळायची म्हणजे ६०।७५ रु. ची! दुध विकणारा पुरभय्या मात्र आपल्या जवळच्या रेड्याप्रमाणें दिवसें-दिवस लठ्ठ होत जातो व काही नाही तरी १०००।५०० रु. जवळ बाळगून असतो. एकाच्या घरात रोजच्या खर्चाची चणचण पण दुसऱ्याच्या घरांत दुधातुपाची चंगळ !

"आपापाचा माल गपापा" अशी आपल्यांत एक म्हण आहे त्याचा अर्थ असा कीं जो मनुष्य लबाडीनें पैसा मिळवितो त्याचा पैसा टिकत नाहीं. पण जगात प्रामाणिक पुरुषांची सम्पात्ति तरी कुठें टिकत असते ? श्रीशिवाजी महाराजांनीं एवढें स्वराज्य स्थापिलें व त्याचेवर श्रीरामदासांसारख्यांनीं आपले आशीर्वाद दिले, पण

तें राज्य टिकलें का ? नाहीं. त्यापेक्षा मुसलमानांचें राज्य ज्यास्ती टिकलें व त्यांतही अवरंगजेबाची कारकीर्द अकबरापेक्षासुद्धां ज्यास्त यशस्वी झाली.

अवरंगजेबानें जगांतील कोणते गुन्हे केले नाहींत ? मनुष्याला जितके गुन्हे करतां येण्याजोगे होते तितके सर्व गुन्हे त्यानें केले. त्यानें बापाला तुरुंगात टाकलें, वडील भावावर तरवार उपसली, धाकट्या भावाशीं ठकबाजी केली, दुसऱ्यांच्या बायका जबरदस्तीनें घेतऱ्या, हिन्दु लोकावर अन्याय केला व दगलबाजीनें स्वामिभक्त सेवकाचे प्राण घेतले. पण त्याचें कोणतें वाईट झालें ? वैभव, सामर्थ्य व दीर्घायुष्य ह्यात त्याला काहींतरी कमी पडलें काय ? नाहीं. त्याच्या मानानें शिवाजी ह्मणजे धर्माचा अवतार होता. पण तो अल्पायुषी होऊन मेला, त्याचा एक मुलगा हालहाल होऊन अवरंगजेबाचे हातूनच मृत्यु पावला, दुसरा मुलगा राज्य सांवरता सावरता उगीं फुटून दगावला व एवढे रामदासाच्या आशीर्वादानें पवित्र झालेलें त्याचें कुल, पण त्याची सून गरीब गाय होऊन मुलासह अवरंगजेबाच्या कैदेंत सापडली. आता बोला सत्याला यश मिळते कीं असत्याला मिळतें ? शिवाजी जरी नुसता दीर्घायुषी झाला असता तरी सत्याच्या प्रशंसनेला जागा होती. पण सत्यवर्तनाचा शिवाजी अल्पायुषी झाला व असत्यवर्तनी अवरंगजेबाच्या एकट्याच्या कारकीर्दीत शिवाजीच्या तीन पिढ्या होऊन गेल्या !

बरें, राज्यावर अवरंगजेबाचा काही वारसा असता तरी हें सर्व क्षम्य मानलें असतें. परन्तु राज्यावर त्याचा कांहींच वारसा नव्हता.

राज्या ा व त्याचा कोणत्याही प्रकारचा सम्बन्ध नव्हता. तो आपल्या बापाचा ति ऱ्ा मुलगा. त्याला राज्यावर येणें कधींच शक्य नव्हतें. पण आपल्याला राज्याचा अधिकार नाहीं ह्या गोष्टीची त्यानें तिळमात्रही फिकीर केली नाहीं. इतर मुलगे राज्यावर यायला बाप मरायची तरी वाट पहात असतात त्यानें तितकीही वाट पाहिली नाहीं. त्यानें बापाला फराफरा सिंहासनावरून ओढलें, त्यानें भावाच्या पोटात कट्यार खुपसली, भावाचा मुलगा वारसा सांगेल म्हणून त्यानें त्याला ठार केलें व बाप, भाऊ आणि पुतण्या ह्यांच्या रक्तानें हात बरबटलेले असताना तो सिंहासनावर चढला. पण तो सुखी झाला त्यानें राज्य दीर्घकाल टिकलें. मुलगे, सुना, लेकी, नातू इत्यादि ज्या काहीं सांसारिक सुखांकरिता मनुष्य धडपडत असतो तीं सर्व सुखें त्यानें पाहिलीं. शिवाजीसारखा प्रबळ शत्रु त्याचे डोळ्यादेखत वारला. शिवाजीच्या मुलाला एखाद्या बकऱ्याप्रमाणें त्यानें सोलले व शिवाजीच्या सुनेला एखाद्या दासीप्रमाणें कैद करून त्यानें आपल्यासमोर आणली. शत्रूवर सूड उगविलेला बघण्यास सांपडणें हें सर्व भाग्यांतले अत्यन्त मोठें भाग्य असें ह्मणतात. तें भाग्य अवरंगजेबाला लाभलें. आणि अशा रीतीनें हा भाग्यवान् पुरुष भरल्या वैभवांत व मुलाबाळांनीं गजबजलेल्या संसारांत वृद्धपणचे जपाचे मणि ओढीत दीर्घ आयुष्य उपभोगून मरण पावला खऱ्याच्या अभिमान्यांनो, शिवाजी व अवरंगजेब ह्यांची तुलना करा व अवरंगजेबाचें असत्य त्यास कोणत्या बाबदींत नडलें तें सांगा.

सत्याच्या प्रौढीचा विचार करतांना अवरंगजेबाचें उदाहरण

आतिशयच नडते. किम्बहुना सत्याच्या सर्व प्रौढीवर अवरंगजेबाच्या उदाहरणाने अगदी बोळा फिरविला जातो. अवरंगजेबाच्या सर्व गोष्टी वर सांगितलेल्याच आहेत. पण त्या सोडून दिल्या तरी एक गोष्ट फारच नडते. ती ही की त्याचा राज्यावर काहींच वारसा नव्हता. ह्याचा उघड अर्थ असा की अवरगजेबाने असत्याचे आच-रण केले ह्मणूनच तो राज्यवैभवावर चढला तो सत्याच्या नादीं लागता तर त्यास राज्यवैभव कधींही प्राप्त झालें नसते तो सत्याने वागता तर तो गरीब, अप्रसिद्ध व फालतू मनुष्य ह्मणून वावरता. तो सत्याने वागता तर इतिहासात त्याचें नाव देखील आले नसते.

अवरंगजेबाचे उदाहरण नीतीचे सर्व ग्रन्थ पुसून टाकीत आहे. ते जगास असे शिकवीत आहे की सत्य हे दुबळें, निर्जीव व नपु-सक आहे. जो त्याचे नादीं लागेल तो बुडेल पण जो असत्याचा स्वीकार करील तो सम्पत्ति, सम्मत्ति व सुख ही ह्या जगात चिर-काल उपभोगील.

असल्या उदाहरणामुळे व जगात बहुतेकाची प्रवृत्ति असत्याकडेच असल्यामुळे जगातील नीतिग्रन्थांना जवळ जवळ कवडीची किमत आलेली आहे. "सत्य वद, धर्मं चर" असे नीतिग्रन्थ कितीही ओरडले तरी कुणी सत्य बोलतही नाही व धर्म आचरीतही नाही. सत्यावर बुटाचा पाय देऊन व धर्माला लाथेने झुगारूनच सर्व जग चाललेले आहे. एवढें बरीक खरे की कुणी सत्याची उघड उघड निन्दा करीत नाहीं व अधर्म हाच खरा असें उघडपणे प्रतिपादीत

नाहीं. पण ज्याप्रमाणें घरात ह्मातारा बाप असला ह्मणजे कर्ती मुलें एकदा फक्त सकाळीं त्याच्या पाया पडतात व मग स्वतंत्रपणें आपल्याला हवेतसे वागतात, त्याप्रमाणे एकदा केव्हातरी सत्य किंवा धर्म ह्याच्या पाया पडण्याची पद्धति लोकानी ठेवलेली आहे पण ह्या पाया पडण्यावरून सत्यावर लोकाची भक्ति आहे अशी कुणी कल्पना करील तर ती चुकीची आहे ह्मातारा बाप फक्त पाया पडण्याच्या उपयोगाचा ! तो जर व्यवहारात लुडबुड करील तर त्याचा शब्द कस्पटाइतकाच मानला जाईल.

आपण कथाकीर्तनाच्या वेळीं देवळात जमतो, मुसलमान लोक दर शुक्रवारी मशीदीत जमतात व दर रविवारी ख्रिस्ती लोक "चर्च" मध्ये जमायचें ठरवितात, ह्यावरून एखाद्याला असे वाटेल की काय हे सद्वर्तनी लोक ! खरोखर आता सत्ययुग सुरू झालें ! आता असत्याचा मागमूसही उरलेला नाही

पण ही सर्व ढोंगबाजी आहे हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. आपणास देवळाची गरज नाही, मुसलमानांना मशीदीची गरज नाही व ख्रिस्ती लोकांस " चर्च " चीही जरूर नाहीं. ही सर्व ढोंगबाजी आहे. देव कुणालाही नको आहे लोकाना फसविण्याकरिता हे सर्व प्रकार आहेत. त्यात परमेश्वराविषयींचें प्रेम काडीइतकें देखिल नाहीं.

ह्यात जर परमेश्वराविषयींचें प्रेम असते तर जगात सत्याचा ज्यास्त ज्यास्त प्रसार होत गेला असता. परन्तु तसा प्रसार कोठे आहे ? कोठेंच नाही. रामजन्माची सुंठसाखर खाऊन बाहेर येण्याचा

अवकाश की सर्वांचे सर्व व्यवहार पूर्वीप्रमाणें सुरू! त्या दिवशीं रामजन्म म्हणून एक देखील लबाडी कमी व्हायची नाहीं. महाराष्ट्रांत मोरोपन्तासारखे पुष्कळ उच्च दर्जाचे कवि होऊन गेले व त्यांनीं अनेक उत्कृष्ट काव्यें लिहिलीं. हीं सर्व काव्यें छापलीं व त्याचा घरोघरी अभ्यास झाला तर लोकांत किती तरी सदाचार वाढेल! पण ह्याप्रमाणें सदाचार वाढत आहे काय ? नाहीं. ह्या काव्यांना कुणी विचारीतही नाही.

कै. माधवचन्द्रोबांपासून तों रा. रा. पराडकरापर्यन्त आजवर अनेक लोकांनी मोरोपन्ताचे काव्यग्रन्थ छापून काढण्याचा प्रयत्न केला. पण हे सर्व लोक बुडाले. ह्यापैकीं एकाही प्रकाशकाला यश आलं नाहीं.

कारण मोरोपन्ताची गरज आहे कुणाला ? कुणालाही नाहीं. मोरोपन्तानें एकशेआठ वेळां श्रीरामचरित्र गाइलें असेल—गावो बापडा! तो आणखी शम्भर वेळां श्रीरामचरित्र गावो. पण बाजारांत कुणाला त्या मोरोपन्ताचीही गरज नाहीं व त्या रामाचीही गरज नाहीं. कदाचित् राम पुन्हां अवतीर्ण होऊन जगांत आलाच, तर एखादा पाताळयंत्री व्यापारी त्यास एकीकडे गांठून विषाची गोळीही द्यायला कमी करणार नाहीं.

जगाला सत्य नको आहे. परमेश्वर नको आहे. जगाला असत्य पाहिजे आहे. मोरोपन्ताच्या कविता छापणाऱ्यांना कशी बूड आली हें वर सांगितलेंच आहे, पण लावण्या छापणाऱ्यांची तशी गोष्ट नाहीं. त्यांनीं त्यांचेवर घरें बान्धलेलीं आहेत—" मला मुम्बईचा

जायचंय्" वगैरे कित्येक लावण्या अशा आहेत कीं त्या न छापतांही पिढ्यान्‌पिढ्या प्रचलित आहेत. त्या कुणीं केल्या हें माहीत नाही, त्यांची कुणी प्रशंसा केलेली नाही, कोणत्याही ग्रन्थसंग्रहालयानें त्या टिकविण्यासाठीं फण्ड काढलेले नाहींत. पण त्या सर्वतोमुखी होऊन टिकलेल्या आहेत. आणि त्या अशाच टिकणार ! वामन आणि मोरोपन्त ह्यांचीं काव्यें जरी बुडाली तरी "मला मुम्बईला जायचंय्" ही लावणी कायमची टिकणार

---

<u>प्रकरण ७ व</u>

( १ ) ह्या जगांत अतिशय मोठा असा जर कोणता गुन्हा असेल तर तो सत्य हा होय

( २ ) सत्य हा एकटाच गुन्हा असा आहे की त्याला हटकून शिक्षा होते

( ३ ) इतर गुन्ह्याबद्दल मनुष्यास क्षमा होते. पण सत्याच्या गुन्ह्यास कधींही क्षमा होत नाहीं. [ पहा, प्रकरण ५, कलम २ ]

( ४ ) सत्य आणि [illegible] कधीं बरोबर व्हायचीं नाहीं विदुराच्या कथा, जनाचा संपर्क, यशुख्रिस्ताचें अनवाणी चालणें व सॉक्रेटिसची गरीबी हीं ह्याचीं उदाहरणें होत

( ५ ) बुद्धिमान् मनुष्य गरीब असला म्हणजे असें अचूक समजावें की तो सत्याचा भोक्ता आहे.

( ६ ) असत्यानें मिळविलेलें सम्पत्ति टिकत नाहीं असें म्हणतात, पण हें खरें नाहीं सत्यानें मिळविलेली सम्पत्ति तरी कुठें टिकत असते ?

( ७ ) पुष्कळ वेळा असत्यानें मिळविलेली सम्पत्तिच सत्यानें मिळविलेल्या सम्पत्तीपेक्षा ज्यास्त टिकते

# प्रकरण ८ वें.

—— 0. ——

## पुणेरी भामटे.




ह्या जगात सत्य मुळींच नाहीं. सत्याचा जय ह्या जगात होत नाहीं व ह्या जगात सत्याची कुणालाही पर्वा नाहीं ह्या तीन सिद्धान्तापर्यन्त आपण इतक्या वेळा पर्यन्त आलों. हे तीन सिद्धान्त खळबळ उडविणारे आहेत आजपर्यंत प्रचलित असलेल्या सर्व समजुतींना ते धक्का देणारे आहेत. ह्या तीन सिद्धान्तांचाच जर एवढा जबरदस्त धक्का, तर ह्यापुढें जे सिद्धान्त निघतील ते किती भयंकर असतील कुणास ठाऊक !

परन्तु ह्या सिद्धान्तांना इतकें भ्यायचें कांहीं कारण नाही कारण सर्व जग सत्याच्या पायावर चाललेलें आहे असा जरी आजपर्यन्तचा सिद्धान्त होता तरी त्या सिद्धान्तामुळें आपण थोडेंच खरें बोलत होतों ! खोटें बोलण्याचा व खोटेंपणानें वागण्याचा आपला सपाटा चाललेलाच होता. मग अमका सिद्धान्त प्रचलित असला काय, आणि तमका सिद्धान्त प्रचलित असला काय. आपल्याला काय त्याचें ?

मागें शहरांतील गुन्ह्यांचें प्रमाण पारखतांना दर हजारीं ९९९ लोक प्रामाणिक असतात असें आपणांस आढळून आलेलें होतें चला. आपण ह्या प्रामाणिक लोकांच्याच गर्दींत शिरूं या व तेथें आपणांस काय काय पहायला सांपडत आहे, बघूं या !

आतां प्रथम प्रामाणीक लोकांची गर्दी असलेल्या ह्या बाजारांत आपण शिरू! प्रामाणिक लोक बाजारांत दुतर्फा लागल्यामुळें कर्न्हेल कोणते व प्रामाणिक लोक कोणते हें कळणेंही दुरापास्त झालेलें आहे.

हा पहा लोडाशी टेंकून बसलेला एक प्रामाणिक मनुष्य ! ह्याचा प्रामाणिकपणा ह्याच्या पोटावरून डुळडुळत आहे. आपला प्रामाणिकपणा तो ह्या पोटात ठेवीत असतो कीं काय कुणास ठाऊक !

वा ! ह्याच्या दुकानाची पाटीतरी किती गोड ! "दुधाचे सचोटीचें दुकान ! " ही पाटी ह्यानें लावल्यामुळें बिनपाण्याचें दुध कोणतें व पाण्याचें दुध कोणते हें लोकाना कळायचें नेमकें साधन झालेले आहे.

ह्याचे दुकानीं दुधाबरोबर उत्तम तूप व लोणीसुद्धा विकत मिळतें असे वाटतें ! वा: ! एकाच्या ऐवजीं तीन वस्तु ! आपण ह्यास एकपट प्रामाणिक समजत होतों, पण हा तिप्पट प्रामाणिक दिसतो.

घ्या, ह्याचे दुकानीं डोळे मिटून वाटेल ती वस्तु घ्या दूध घ्या, तूप घ्या किंवा लोणी घ्या. त्यात भेसळ ह्मणून मिळायची नाही. चला, मिटा डोळे.

पण डोळे मिटल्याबरोबर हा काय चमत्कार ! गिऱ्हाइकाचे डोळे मिटण्याचा अवकाश की ह्या सचोटीच्या दुधात पाणी शिरलें! लोण्यात पीठ मिसळलें गेलें ! व तुपात चरबी घातली गेली!

हें असे कसें झालें ? ह्या प्रामाणिक मनुष्याच्या ह्या मालांत ही भेसळ कोठून आली ? ही त्याची स्वत:ची कारवाई मुळींच नव्हे,

कारण हा प्रामाणिक मनुष्य आहे. ९९९ प्रामाणिक लोकांपैकीं हा एक प्रामाणिक मनुष्य आहे. ह्याच्या हातून असली गोष्ट कधींही व्हायची नाहीं. हजारात जो एकच अप्रामाणिक मनुष्य होता त्यास पोलीसानीं केव्हाच पकडून नेलें आहे! त्यास मॅजिस्ट्रेटपुढें उभेंही करण्यात आलेलें आहे! तो इथे दुधांत पाणी घालण्याकरिता कसा येईल?

मग ह्या दुधात पाणी कसें शिरलें? अलीकडेच पाणी असें उच्छृंखल कशानें झालें की जें प्रामाणिक मनुष्याच्या दुकानात शिरून त्याच्या दुधात जाऊन बसतें? ह्या प्रामाणिक मनुष्याच्या प्रामाणिक पाटीची त्यास काहीच भीति वाटत नाहीं काय? ह्या प्रामाणिक मनुष्याच्या अगडबम्ब पोटाचीही त्यास काहींच भीति वाटत नाहीं काय?

नाही असें दिसतें! त्याशिवाय ह्या प्रामाणिक मनुष्याच्या प्रामाणिक दुधात नळातलें उच्छृंखल पाणी खास आलें नसतें.

किंवा असेंही असेल की ह्या प्रामाणिक मनुष्यानेच आपल्या प्रामाणिक दुधात अप्रामाणिकपणानें पाणी घातलें असेल! होय! असेंच खरें दिसतें! ह्या प्रामाणिक मनुष्याचेंच हें काम! त्यानेंच गिऱ्हाइकाचा डोळा चुकवून दुधांत पाणी घातले आणि हे पाणी घातलेलें दूध चट्टदिशीं विकलें जावें म्हणून त्यानें ही प्रामाणिकपणाची अप्रामाणिक पाटी आपल्या दुकानावर लटकावून दिली!

काय भय्या? खरें ना हें?

नाहीं, रावसाहेब ! ह्या दुधांत पाणी घातलें असेल तर पोराची शपथ !

शिव ! शिव ! शिव ! केवढासा लाभ व तेवढ्याकरितां पोटच्या पोराच्याही शपथा !

पण भय्याला माहीत आहे कीं ह्या कलियुगात जसे कुणाचे शाप खरे होत नाहींत, तशा शपथाही बाधत नाहींत ! मग खोट्या शपथा घ्यायला काय हरकत आहे ? शिवाय ह्यांबद्दल शासन झालेंच तर तें पुढे होईल ! पण सध्यातरी पाणी घातलेलें दुध विकेल ना ?

——— 0. ———

अहाहा ! काय हा झकझकाट ! या रावसाहेब, या ! काय पाहिजे तुम्हांला ?

आम्हांला ना ? आम्हाला विशेष काहीं नको आहे. पण एक चामलीशी नथ पाहिजे आहे.

मग आपल्याकडे तयार आहे. कमली पाहिजे नथ ? झुपक्याची पाहिजे ? हिऱ्याची पाहिजे ? की सरजाची पाहिजे ?

कोणचीही दाखवा. पण चांगल्यापैकीं दाखवा अलीकडे मोत्या-च्या मालाची मोठीच पचाईत झालेली आहे. खोटा माल बाजारांत इतका आलेला आहे की कांही बोलायची सोय नाही. ह्याशिवाय जपानचें "कलचर्ड" मोतीं ! जपानी मालानें तर आमच्यासारख्यांची तिरपीट उडविलेली आहे.

पण आपण काहीं काळजी करूं नका. आपल्या दुकानांत तसें काहींएक व्हायचें नाही. आपल्या इथें फक्त खरा माल ! दुसरा

माल आपण कधींच ठेवीत नाहीं. खोटा माल ठेवायचा आणि दुकानची पत घालवायची ह्यांत अर्थ काय ! त्यापेक्षा दोन गिऱ्हाइकें कमी आलेलीं पत्करलीं !

वा.! ह्मणूनच आपले दुकानीं आलों. आह्मांला असेंच विश्वासूक दुकान पाहिजे होतें.

इथें सर्वांना किंमत एक ! एखादें पांच वर्षांचें मूल आलें तरी इथें फसायचें नाहीं.

रावसाहेब खूष झाले. दुकानदारांनीं त्यांचेपुढें नथांचे भराभर नमुने ठेवले. रावसाहेबांना, आपण काय घ्यावें आणि काय घेऊं नये, असें झालें. एक एक नथ झोकबाज ! पाणीदार ! आणि किंमती त्याच्या अन्दाजापेक्षां कितीतरी स्वस्त !

रावसाहेबांना त्यांस्तीं बोलतां येणेंच शक्य नव्हतें. आपण अगदी योग्य किंमतीला नथ घेतली असें रावसाहेबांना वाटलें. त्यांनीं किंमत पटवली ते सहर्ष मुद्रेनें तेथून चालते झाले.

रावसाहेबांच्या घरचे लग्न झालें. ती नथ त्यांनीं आपल्या सुनेला घातली. नवरीला सासरीं दागिने घातले ह्मणजे पहिली गोष्ट ह्मणजे तिच्या दागिन्यांची चर्चा ! नेहमीं प्रमाणें ती चर्चा झाली आणि त्यात माहेरच्यांपैकीं एकीनें अशी शंका काढली कीं नथ खोटी आहे !

नथ खोटी आहे? अर्थात् ! रावसाहेबांनीं व्यापाऱ्यांना खूपच बनविलें ! रावसाहेबांचे जवळची सर्व श्रीमन्ती अशी नकलीच आहे एकून! पण एवढी नकली श्रीमन्ती रावसाहेबांनीं कशाकरितां

दाखविली ? केवळ हुण्डा उकळण्याकरिता ! पण निदान, आपली पहिली सून, तिच्या अंगावर त्यांनीं असे नकली दागिने घालायचे नव्हते !

शेवटीं गोष्ट रावसाहेबांचे कानावर आली! रावसाहेब सन्तापले ! रावसाहेबांच्या पत्नी तर रागानें फणफणल्या ! आमचे दागिने नकली काय ? नकली दागिने घालायला आम्ही कांहीं " पुणेरी भामटे " नाही.

[ ह्या शब्दांतली खोंच लक्ष्यांत येण्याकरितां एवढें सांगितलं पाहिजे की रावसाहेबाचे व्याही ह्मणजे नवऱ्या मुलीचे वडील पुण्या-तले रहाणारे होते. ]

पण एवढ्यावर हें भाण्डण मिटेना ! तें जास्त वाढत चाललें ! शेवटीं कोणी परीक्षक आणवून नथेची पारख करावी असे ठरलें ! परीक्षक आणविला ! परीक्षकानें नथ परोपरीनें तपासली ! अखेरीस त्यानें आपले मत दिलें कीं नथेंतील दोन मोतींच काय ते खरे आहेत, बाकी सारे दाणे येथून नेथून खोटे आहेत !

रावसाहेबांचें तोण्ड उतरलें ! त्यांच्या पत्नीचा तोरा नाहींसा झाला ! करवल्यांची वाचा बन्द झाली ! जांवईबोवा शर्टचे बटन कुसकरूं लागले ! सर्वांची खातरी झाली कीं रावसाहेबांनीं व्याह्यांना 'बनविलें' !

पण खरी वस्तुस्थिति निराळी होती. रावसाहेबानीं व्याह्यांना बनविलें नव्हतें, तर ज्या प्रामाणिक मोतीवाल्याचे दुकानावर रावसाहेब

गेले होते त्या प्रामाणिक व्यापाऱ्यानें रावसाहेबांस बनवून त्यांचे गळ्यांत बनावट नथ बान्धली होती! रावसाहेबांस हें आतां समजलें! रावसाहेब खजील झाले ! रावसाहेबांनीं मुकाट्यानें पुण्यांतून पाय काढला. त्या दुकानदाराचे दुकानावर जायचेंही रावसाहेबाना भान राहिलें नाहीं.

पण रावसाहेबांना तसें भान राहिलें असतें तरी काय झाले असतें? तो प्रामाणिक व्यापारी नेमका रावसाहेबांचे गळ्यांत पडला असता आणि त्याना म्हणाला असता, तुम्ही पाण्ढरपेशे लोक रिकामी ऐट करायला जाता आणि त्याकरितां आमच्या-जवळून नकली दागिने नेता ! तुह्मी आला त्याच वेळी तुम्हाला सांगितलें होतें कीं एवढें मुलाचे लग्न ! त्या लग्नांततरी असले खोटे दागिने वापरूं नका ! पण तुम्ही ऐकतां कशाला आमचें? आतां तुमचा खोटा दागिना लोकांनीं ओळखला तर त्यात आमच्यावर काय दोष ? तुम्हांला खरा माल पाहिजे तर आमच्याकडे वाटेल तेवढा पडलेला आहे. किंमत मोजा आणि खरा दागिना घेऊन जा !

त्या प्रामाणिक व्यापाऱ्याचे सर्व हिशोब आणि वह्या त्याच्या ह्या ह्मणण्याला शोभतील अशाच बनविलेल्या होत्या हें सांगायला नकोच !

———:o:———

अहाहा ! काय हे विरक्त साधु ! साधु असावे तर असे असावे! नाहींतर अलीकडचे भोन्दु ! लोकांना ठकविण्यापुरते साधु बनलेले!

साधु निपटनिरंजन ह्यांची अशीच प्रसिद्धि अलीकडे झालेली होती. जो तो त्यांची तारीफ करीत होता. जो तो त्याच्या विरक्तपणाची महती गात होता.

साधु निपट निरंजन कुणाशींही बोलत नसत ! तें कांहींही खात नसत! त्याना कुणाचाही सहवास आवडत नसे ! आपण बरें कीं आपला एकान्त बरा ! आणि ह्या एकान्तांत काय चालत असे ? फक्त प्रभुनामाचें ध्यान ! भांग, गांजा, चिलीम हे जे साधुपणाचे नेहमींचे सहचारी—त्यांना सुद्धा साधु निपटनिरंजन ह्यांचेनवळ बन्दी होती ! त्यांना खाण्यापिण्याचीही शुद्धि नव्हती ! मग भांग आणि गांजाची शुद्धि कोठून असणार !

अनेक लोक त्यांचे भजनीं लागले ! अनेक लोक त्यांचे दर्शन घेऊं लागले ! अनेक लोक त्यांचेपुढें नानाप्रकारचे पदार्थ ठेवूं लागले! पण ह्यांपैकीं एकही पदार्थ कधीं हलला नाहीं ! हलेल कसा ? साधु महाराज कधीं खातील पितील तर हे पदार्थ हलतील ? साधु महाराज कधीं खाणारच नाहींत तर पदार्थ हलणार कसे ?

पण अखेर एक दिवस एक गंमत झाली ! साधु निपटनिरंजन एकाएकीं नाहींसे झाले व चमत्कार असा कीं त्यांचेबरोबर शहरांतील नगरश्रेष्ठी शेठ माधवदास रणछोडदास ह्यांची तरुण बायको बेहेन सुन्दरमालती ही नाहींशी झाली ! ती गेली ती आपल्या सर्व दागिन्यांसकट गेली! त्या विरक्त साधूचा व बेहेन सुन्दरमालतीचा आजपर्यंत पुष्कळ शोध करण्यांत आला. त्याकारिता पुष्कळ

स्पेशल डिटेक्टिव्ह "एंगेज" आले ! पण व्यर्थ ! साधु निपटगिरंजनही सांपडले नाहीत व बेहेन सुन्दरमालतीही दिसल्या नाहीत.

काय ? हे निपट निरंजन करार्चीचे कोणी मुसलमान तर नसतील ना ? व सुन्दरमालतीला पळवून नेऊन त्यानीं तिला एखादी रोशान बिब्बी तर बनविली नसेल ना ?

काय नियम सांगावा ' ह्या प्रामाणिक जगांत काय नियम सांगावा'

---

प्रकरण ८ वें.

(१) ह्या जगातील प्रत्येक दुकानदारांत लबाडी चालत आलेली दिसते.

(२) जे दुकानदार "सचोटी" बद्दल पाट्या लावतात ते फार ज्यास्त लबाड असतात.

(३) देवळातही लबाडी असते. एकान्तात तपश्चर्या करणाऱ्या मिषानें अनेक साधु दुसऱ्याचे बायकावर नजर ठेवतात व त्यांना फुसलावून नेतात



# प्रकरण ९ वें.

## हे पहा पायघोळ सन्त !



मागें " भूलभुलैय्या " ह्या नांवाचें एक नाटक होत असे ! हे नाटक फार लोकप्रिय होतें. त्याचे शेंकडों प्रयोग मुंबईत झाले आणि त्याच्यांतली अनेक पदें लोकाच्या तोण्डी झालीं.

ह्या पदात एक फार प्रसिद्ध पद होतें. आणि तें " पागल " पणावर होतें. त्यांतील

**अब घर पागल**
**सब घर पागल**
**घर घर दीवाना**
**तुम भी पागल**
**हम भी पागल**
**किसका गम खाना ?**

हीं कडवीं ह्मणतांना मौज होई ! ज्याच्याकडे हे पद ह्मणायची पाळी येत असे तो सोराबजी फार नकली नट होता. हें पद ह्मणतांना तो विलक्षण हावभाव करी आणि ह्या जगांतले सारे लोक पागल आहेत अशी प्रत्येकाची खातरी पटवी ! आपण पागल आहोंत असें लोकांकडून ह्मणवून घेणें ही कांहीं मोठी मौजेची गोष्ट नाहीं.

ह्या मनुष्यांचा उपमर्द आहे. पण आपल्या हावभावांत ह्या उपमर्दातील अणकुचीदार खोंच तो नट प्रेक्षकांना विसरायला लावी आणि आपल्याला पागल ह्मटल्याबद्दल कुणालाही त्या नटाचा राग न येतां त्याचे कौतुकच वाटत असे.

लबाडीचेही असेंच आहे

तुम भी पागल
हम भी पागल

हे जसें खरें, त्याप्रमाणें "तुम भी झूठे हमभी झूठे" हें खरें आहे. हजारात ९९९ लोक प्रामाणिक असल्याचे अनुमान आपण काढलें! पण असा एक तरी धन्दा जगात दाखवा कीं जेथें लबाडी केली जात नाही ! सररहा प्रत्येक धन्द्यात लबाडी ! असा कोणता व्यापार किंवा उद्योग ह्या जगात आहे कीं जेथे प्रत्येक मनुष्य थोडीशी तरी लबाडी करीत नाही ?

सोनार, शिम्पी, कुळकर्णी अप्पा—ह्याची मागील शतकांत फार निन्दा झाली. सोनार लोक लोकाचें कान कापतात, शिम्पी लोक गळा कापतात व कुळकर्णी लोक मान कापतात, ह्मणून ह्या लोकाची बदनामी होते ती ठीकच होते ! पण सोनार, शिम्पी, आणि कुळकर्णी अप्पा ह्यांनाच तेवढी ठकबाजीची मक्तेदारी दिलेली आहे असें नाही ! प्रत्येक मनुष्य ठकबाजीच्या प्रयत्नात असतोच. सोनार, शिम्पी आणि कुळकर्णी अप्पा ह्याचें फक्त नांव—पण लबाडीला प्रत्येजण पुढे !

दुधांत पाणी घालणाऱ्या गवळ्यापासून तों शेटजींची बायको पळविणाऱ्या निपटनिरंजनांपर्यन्त निरनिराळीं उदाहरणें आपण मागल्या प्रकरणांत पाहिलेलींच आहेत. पण जगात कांहीं एवढींच उदाहरणें नाहींत ! ग्राहकांच्या गोण्या उचलतांना तोंडात खारका टाकणारा मजूर, सावकाराचे गड्यांत किंवा मुठीं कणसें बान्धणारा शेतकरी, वजनात कांटा ढळवून गिऱ्हाइकाला कमी माल देणारा वाणी, शिमगा, फाल्गुन व होळी असा हेंगाडा हिशोब करून एकाच महिन्यांत तीन महिन्यांचें व्याज आकारणारा मारवाडी, निरनिराळ्या कापूस एकांत एक मिसळून ज्यास्ती दर लावणारा व्यापारी. खोट्या बँका काढून खाका वर करणारा डायरेक्टर, दोन्ही बाजूंनीं फी घेऊन स्वतःचे खिसे गरम करणारा वकील, खोट्या रंगाचा माल देऊन खऱ्या रंगाची किंमत उपटणारा दुकानदार, शेअर्सची अफवा उठवून आपला तळीराम गार करणारा दलाल, दारूच्या पदार्थांवर स्वतःचें पोटें जाळणारा " वाईन-मर्चण्ट ", भाजीवालीच्या भाजींतली भाजी व मुळेवालीच्या मुळ्यांतले मुळे उचलणारा पोलीस, साहेबाकडे जाणाऱ्यायेणाऱ्याकडून बक्षिशी उपटणारा शिपाई, लाच खाऊन न्यायाची विक्री करणारा जज्ज, नडलेल्या लोकांपासून फी उपटणारा रजिष्टर, हीं सर्व अप्रामाणिकपणाची उदाहरणें होत. ह्या जगांत कांहीं कांहीं धन्दे विशेष अनीतीचे असे ठरलेले आहेत. तेथें चांगले विचार मनांत आणणेंही पातकाचें असतें—मग चांगलें बर्तन करणारे लोक ह्या धन्द्यांत कोठून आढळणार ?

ह्यांपैकीं दारूच्या दुकानांची गोष्ट वर सांगितलीच आहे. वेश्यांच्या धन्याचें नावच घ्यायला नको. त्यास "धन्दा" ह्मटलें तरी तो अनाचार व "अनीति" ह्मटलें तरीही तो अनाचारच! कसायाचाही धन्दा त्यांतलाच होय! कसाई दयाळू असणे मुष्किलच! त्यात सज्जन कसाई कोण निपजत असेल तो निपजो!

पण कसाई पापी असला, वेश्या पापी असली अथवा दारूचा दुकानदार पापी असला तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण त्या धंद्याचे अंगातच पाप आहे पापीपणाची आणि त्या धन्द्याची ताटातूट करताच यायची नाहीं त्या धन्द्यात राहणे आणि निष्पाप असणें ह्मणजे आगींत उभे राहून शरीर शाबूद ठेवण्याची उमेद बाळगण्यासारखें आहे.

पण कांहीं धन्दे मूळ चांगले असूनही मनुष्यांनीं आपल्या फाजील शहाणपणामुळें ते पापी बनविले आहेत. गायकाचा धन्दा घ्या. गायकाचे धन्द्यांत स्वभावतः वाईट असें कांहींच नाहीं पण त्यांत जेव्हां ज्यास्त हुषार माणसें शिरलीं तेव्हां त्यांनीं धन्द्याची वाताहात बिघडवली. आतां तर गायकीचा धन्दा म्हणजे जवळ जवळ कसबिणीचा धन्दा झालेला आहे! गाणारीण आणि नायकीण ह्यांत आता फारसा फरक नाहीं. "क्वचित् गानी पतिव्रता" ही घेडगुजरी संस्कृत कविताही हेंच दाखविते.

नाटकाचा धन्दाही त्याच पंक्तीला जाऊन बसलेला आहे. नाटकाचा धन्दा एकेकाळीं कदाचित् प्रतिष्ठेचा असेल. भरत मुनींचे

वेळीं तो खरा प्रतिष्ठेचा होता. तो तसा होता म्हणूनच कविकुल-मुकुटमणि कालिदासानें शाकुन्तल लिहिलें. महाराष्ट्रांतही कांही लोकांनीं त्यास प्रतिष्ठित दर्जात ठेवलें. पण इतर लोकांनी त्यास अधःपतनाचें द्वार बनविलें. कांहीं कांहीं वेळां वेश्या बऱ्या पण नाटकी लोक नकोत असें होतें आणि कांहीं नाटकी माणसें उम्बरठ्यांत उभीं करण्याच्या लायकीचीही नसतात. आणि हें केवळ ह्याच देशांत घडतें असें नाहीं. युरोप अमेरिकेंतही नाटकवाल्या लोकांसम्बन्धानें हीच तक्रार आहे.

आणि आतां बोलूं नये. पण बोलायला कांही हरकत नाहीं, अलीकडील काळांत "नर्सेस" व "मास्तरणी" ह्या धन्द्याचीही अशीच खराबी झालेली आहे. वस्तुतः ह्या धन्द्यांत वाईट असें कांही नाहीं. हे उत्कृष्ट, पवित्र व परोपकाराचे धन्दे आहेत. पण ह्या धन्द्यांत अलीकडे काय भ्रष्टाकार ! "नर्सेस" बोलावणं, "मास्तरणी" राखणं व वेश्या "ठेवणं" हे सर्व एकच कीं काय असेंही केव्हा केव्हां वाटायला लागलेलं आहे ! छेः छेः ! काय हा अधःपात ! हे पवित्र धन्देही त्यांच्या नैसर्गिक पवित्रतेत राखतां येऊ नयेत काय !

पूर्वीच्या "अडाणी" कालात भ्रष्टाकाराचा प्रसंग सैपाकणींवर येत असे. ह्या अनाथ स्त्रिया केवळ असहाय असल्यामुळे मालकाचे दुष्ट इच्छांना निरुपायानें त्या बळी पडत असत. बायको मेल्यानन्तर एखादी जरा तरुणशी व होतां होईल तों देखणी गतधवा

स्त्री घरांत सैपाकीण ह्मणून ठेवण्याची पूर्वीच्या " अडाणी " लोकाची पद्धतिच होती. पूर्वी पुनर्विहाला बन्दी असे व सामाजिक निर्बन्धही पुष्कळ असत आणि ह्मणून कामी पुरुषाच्या अकला सैपाकघराकडे वहावत ! अन्न शिजविण्याच्या चुलीवरच त्या काळांत नीतिशास्त्राचा होम होत असे.

पण आतां कांहीं पुरुष ह्यापेक्षाही हुषार झाले आहेत. विशेषतः शिक्षणखात्यावर यांची नेमणूक झालेली असली तर त्यांना सर्व मास्तरणी ह्मणजे गोपालकृष्णाच्या रासक्रीडेंतल्या गोपींचा ताण्डाच वाटत असतो. अल्पमत्त शिक्षकिणी पैशाच्या अडचणींत दिसल्या की तेथें हे गोसावगणेश राधादामोदरासारखे उभे, पण ह्या विद्वान् पण्डितांना 'पापी' ह्मणण्याची चोरी! त्यानीं आपलीं दुष्कृत्यें चोरून केलीं किंवा उघड केलीं तरी त्याबद्दल त्याची तारीफच कराबला हवी व चोरूनही त्याना नावें ठेवता उपयोगी नाहीं !

मग आता असा कोणता धन्दा आहे बोला कीं जेथे लबाडी होत नाहीं ? वेश्येपासून शिक्षकिणीपर्यन्त व दारूविक्यापासून पदवीधरापर्यन्त सर्व लोक घेतले तरी ह्या सर्व ठिकाणीं असत्य बुजबुजलेलें आहे असेंच दिसून येतें. मग सत्याला थारा तरी आहे कोणत्या धन्द्यांत ?

का बरें ? असें का ह्मणता ? हा पहा सांवळा मनुष्य ! केवढ्यान्दा पुरुषसूक्त ह्मणत आहे ! हा पहा शास्त्री ! ह्यानें डोक्याला केवढी शालजोडी गुण्डाळली आहे ! हा पहा हरिदास ! ह्यानें हा केवढा बुक्का कपाळाला लाविलेला आहे ! हा पहा रामदासी ! ह्यानें ही केवढी कफनी अंगावर घातलेली आहे ! ह्या कफनीच्या आंत

काय पाप दडून बसलेलें असेल ? छे:, छे: नांव कशाला ! परमेश्वराचे अवतारच हे ! काय करावें ? ह्या काळांत एखादा शिवाजी नाहीं म्हणून ! नाही तर ह्यांपैकीं प्रत्येक सज्जनास त्यानें एकएक सज्जनगड बक्षीस दिला असता !

पण पाहूं का ह्या कफनीच्या आंत? धरूं का हा बुका तपासून ? करूं का ह्यांच्या पुरुषसूक्ताची छाननी ?

काय ? नको ? नको ? नको ? का बरें नको ? बरें आहे, नको तर नको ! सज्जनांनो पुसा तो घाम ! व्हा स्वस्थ ! आम्ही तुमची छाननी [illegible] सोडून दिली ! शरणागताला शरण देण्यांत का पुरुषार्थ ?

हां ! हां ! दुष्यन्तभूपाला
आंवरी रे बाण आपुला

असें म्हटल्याबरोबर दुष्यन्त राजानें हरणाना देखील सोडून दिलें ! मग तुम्ही तर माणसें ! व भस्म लावलेलीं, रुद्राक्ष घातलेलीं माणसें ! अगदीं पायघोळ सन्त ! तुमची फटफजीती कोण बरें करील ?

काय ? तुम्ही रागावलां ? पायघोळ झगा घातलेले तुम्ही खिस्ती पाद्री रागावलां ? रागावूं नका. रागावूं नका. तुम्हीही आमच्या लक्ष्यात आहांत ! आम्ही रुद्राक्षवाल्यांना स्मरतों आणि क्रूसवाल्यांना विसरतों अशांतला भाग नाहीं. अहो, घरोघर मातीच्या चुली ! तुम्ही खिस्ती झालां म्हणून ओल्या मानवी देहाची ही बण्डखोर माती केव्हां केव्हां खिस्ती देवळाच्या आवारांतही नीतळ मातीत मिसळते हें आम्ही कसें विसरूं ? तुम्ही लम्ब दाढी वाढवून देवळाच्या

मोठमोठ्या न मशीदींत हाक मारणारे काजी आणि मुल्ला हेही आमचे ध्यानांत आहांत. अहो, मनुष्याचें पातकी रक्त उसळलें ह्मणजे त्याला कुठलें देऊळ, कुठलें ' चर्च " व कुठली मशीद! मग काजी व खिस्ती पाद्री—सर्व सारखे ! मनुष्यानीं जमिनीवर देऊळ बांधलें ह्मणून ते नीतिला जमीनदोस्त करणार नाहींत असा काय भरवंसा आहे!

हाय् ! हाय् ! वेश्यागारापासून देवळापर्यन्त सर्वत्र एकच मासला! सर्वत्र अनृत, अनीति व असत्य ! हाय् ! हाय् ! कोठें गेली ? एका हजारांतलीं तीं ९९९ प्रामाणिक माणसं कोठें गेलीं ?

हं ! आता न मग आधार [illegible], [illegible] मन्दिर व धर्ममन्दिर ह्यातही जरी कदाचित् अनीति शिरलेली असली तरी राजमन्दिरात अनीति खात्रीनें नसेल ! कारण

सा रम्या नगरी
महान् स नृपतिः
सामंतचक्रं च तत्

एवढें जें प्रचण्ड साम्राज्य तिथें असत्य किंवा अनीति कोठून असेल!

ऑल राइट् . पाहू या ! नसेल तर त्यांत आह्माला आनन्दच आहे.

---

प्रकरण ९ वें

(१) लबाडी नाहीं असा एकही धन्दा नाहीं. लबाडी नाही असा एकही व्यवहार नाहीं.

(२) कांहीं धन्दे मूळ चांगले असूनही लबाड लोकांनीं ते अनीतीचे धन्दे बनविले आहेत. गायनाचा धन्दा ह्यातलाच एक आहे.

(३) नर्स व शिक्षिकणी ह्याही अनीतीचे सङ्गीत पडूं पहात आहेत.

(४) खुद्द देवळांतही लबाडी शिरलेली आहे. [ पहा, प्रकरण ८, कलम ३ ]

# प्रकरण १० वें.



## कलकत्त्याजवळील एक बंगला.





ती वेळ तुफानाची होती. समुद्रात लाटावर लाटा उसळत होत्या. वाऱ्याने कडावयाचें युद्ध चाललेले होतें वरून पाऊस पडत होता वीज तळपत होती. सर्वत्र गडप्प अंधकार पडलेला होता.

सृष्टितील पंच तत्त्वें खवळलेलीं होती. एकमेकावर मात करण्याकरिता त्यांची जणूं शर्यत लागलेली होती. निसर्गानें डोळे वटारलेले होते पृथ्वीला कम्प सुटलेला होता.

सर्वत्र कडकड शब्द ऐकूं येत होता. हा शब्द कुणाचा होता? कदाचित् तो शब्द लाटांचा असेल, कदाचित् तो शब्द वाऱ्याचा असेल, कदाचित् ती मेघाची घनगर्जना असेल, कदाचित् तो सर्वांचा एकवटलेला शब्द असेल.

सर्व जीव घाबरलेले होते. समुद्राच्या तळांतले, मध्यभागातले व पृष्ठभागावरचे सर्व जीव घाबरून गेलेले होते त्यांना इतके दिवस आश्रय देणारा समुद्र आज जणूं त्यांना खायला निघालेला होता. एखाद्या विश्वासघातकी घरवाल्याप्रमाणें तो आज जणूं सर्वांना मृत्यूच्या स्वाधीन करणार होता. एखाद्या विश्वासघातकी

वाटाड्याप्रमाणें त्यानें आज जणूं सर्वांना धोक्याचे ठिकाणी कोण्डून टाकलेलें होतें.

समुद्रांत किती प्राणी असतात ? अनन्त प्राणी असतात. पृथ्वीवर जेवढी सृष्टि दिसते तेवढी समुद्राचे उदरांत असते भूपृष्ठभागावर जेवढे जीव राहातात तेवढे समुद्राचे उदरांत असतात. ह्या जीवकोटींमध्यें अनन्त क्षुद्र माशापासून तों गलबताएवढ्या मोठ्या माशांपर्यंत सर्व प्राणी असतात. पण सर्व प्राणी आज घाबरून गेलेले होते. हत्तीच्या अगाएवढाले ते अगडबम्ब प्राणी! पण आज ते घाबरून गेलेले होते इतके दिवस त्यांची इतर प्राण्यांना दहशत होती. इतर प्राण्यांना ते इतके दिवस भीति उत्पन्न करीत होते. पण आज त्याना स्वतःला दहशत बसलेली होती. मोठ्याचें असेंच आहे. जेव्हां संकटकाल नसतो तेव्हां मोठे लोक गरीबांना खाऊन टाकतात. आणि ज्या वेळी संकटकाल येतो त्या वेळीं मोठे लोकच पहिल्यान्दा घाबरून जाऊन गरीबाचें संरक्षण करण्यास असमर्थ होतात.

अशा वेळीं एक गलबत ऐन तुफानांतून चाललेलें होतें. त्यांत माणसें फार नव्हतीं. थोडी होतीं. तीही अशींच गर्भगळीत झालेली होतीं. आपण येथेंच मरणार असें त्यांना वाटत होते. कुणीकडून आपण घरून निघालों व सुखाचा जीव धोक्यांत घातला असें त्यांना वाटत होतें.

“ आपण उगीच हिन्दुस्थानला जायला निघालों ”—एक जण म्हणाला.

" खरेंच " दुसरा म्हणाला—" एलिझाबेथ् राणीनें आपणांस हिंदुस्थानच्या व्यापाराची सनद दिली तरी आपण विचार करायला पाहिजे होता. पोर्तुगीज लोक हिन्दुस्थानशीं व्यापार करायला निघाले म्हणून आपण हुरळून जायला नको होतें. आतां उद्या आपण मेलों तर— "

" मेलों तर मेलों "—आणखी एकजण म्हणाला.—" मनुष्याला साहसांत एखादे वेळीं मरणही यायचें ! पण त्यामुळें मनुष्यानीं साहस करूं नये कीं काय ? मला तर वाटतें कीं आपल्या त्या भिकार इंग्लंडमध्यें दारिद्र्याखालीं टांपा झाडून मरण्यापेक्षां हिंदुस्थानसारख्या सुवर्णभूमीचें चिन्तन करीत समुद्रामध्यें बुडून मरावें हें फार चांगलें ! "

" काय ? हिन्दुस्थान देश सोन्याचा आहे ?" आणखी एक खलाशी उत्सुकतेनें म्हणाला. " आपल्या भिकार इंग्लण्डपेक्षां हिन्दुस्थान देश खराच श्रीमंत आहे काय ? "

" अरे हें काय विचारतोस ? कुणीकडे आपल्या इंग्लण्डमधली ती भिकार मका आणि कुणीकडे हिन्दुस्थानातली अलोट सम्पत्ति ! हिन्दुस्थानचा एक कोंपरा खणला तर तिथें इतकी सम्पत्ति मिळेल कीं त्यामुळें सर्व इंग्लण्ड भरून जाईल !"

" अहाहा ! असें असेल तर हाकारा लवकर गलबत ! आतां एकच निश्चय! ह्या इथें तुफानांत मरून तरी जाऊं किंवा हिन्दुस्थान गांठून इंग्रजांची व्यापारी वखार तेथें स्थापूं !

* * * * *

कांहीं वर्षांनन्तरची गोष्ट ! सुरत, मद्रास, कलकत्ता इथें इंग्रजांच्या वखारी उघडलेल्या आहेत व त्यांचा व्यापार जोरानें सुरू झालेला आहे. डच्, फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे लोकांशीं त्यांच्या लढाओढी झालेल्या आहेत व आपल्या लाघवी भाषणामुळें इंग्रज व्यापारी सर्वांना प्रिय झालेले आहेत

" अरे, इथले लोक अगदी भोळे दिसतात"—एके रात्रीं वखारींतला एक मनुष्य दुसऱ्यास ह्मणतो.

" अरे भोळे नव्हे तर लेकाचे ! त्यांना सुमारच नाहीं. त्यांच्या भोळेपणाची शर्थ आहे कारे ! त्याची त्याना कल्पना सुद्धा नसेल. वाटेल त्याला ते आपल्या देशांत येऊं देतात व वाटेल तें करूं देतात."

" शिवाय हे लोक वचनाचे फार बळकट ! वचन मोडणें ह्मणजे तोंडाला काळें फासण्यासारखें त्याना वाटतें ! एखादे वेळीं ते घरावर तुळशीपत्र ठेवतील, पण आपलें वचन ते कधींही बदलायचे नाहींत !"

" छे:, छे: अगदींच वेडे ! इतके वेडे लोक नव्हते पाहिले कधीं ! आपल्या शब्दाची त्याना इतकी काय किंमत वाटते कुणाला ठाऊक !"

" अरे वचनें ह्मणजे फुटबॉल ! एकानें आपलें वचन लाथाडून दुसऱ्याचे अंगावर भिरकवावें व दुसऱ्यानें आपलें वचन लाथाडून तिसऱ्याचेकडे लोटावें ! लोहचुम्बकाप्रमाणें वचनाला चिकटून बसणें ह्मणजे अडाणीपणाची कमाल आहे."

" आणि ह्या लोकांत मिठाला जागण्याची आणखी एक मूर्खपणाची पद्धति आहे. एखाद्याचें मीठ खाल्लें की ते जन्माचे गुला-

बनतात. मग मग तुम्हीं त्यांना सख्ख्या भावाची मान तोडायला सांगितली तरी खुशाल तोडतील !"

"खरोखर काय मूर्खपणा हा ! ह्या मूर्खपणाला पारावारच नाहीं."

"अरे, पण त्यावरूनच मला एक कल्पना सुचलेली आहे."

"कोणती ? कोणती ती ?"

आपण ह्या लोकांच्या पलटणी उभारूं आणि ह्याच लोकांच्या हातानं ह्यांचा पाडाव करूं. ह्या लोकांच्या भाण्डणांत एकदा आपलें बोट शिरकूं द्या —कीं इंग्रजीं वखारींप्रमाणें आपल्याला इंग्रजी राज्यसुद्धां उभारतां येईल."

"छेः, असली गोष्ट करणें अनतिचें आहे. ज्या लोकांनीं आपल्याला स्वतःच्या देशांत येऊं दिलें, ज्यानीं आपला सत्कार केला, ज्यांनी आपल्याला सवलती दिल्या व ज्यानीं सर्वांच्यापेक्षां आपल्यावर विश्वास ठेवला त्या लोकांचें राज्य घेणें आणि ते त्यांच्याच भाण्डणाचा फायदा घेऊन व त्यांच्याच लोकांच्या हातून ! छेः, मला तर ही गोष्ट अत्यन्त नीचपणाची वाटते."

"अरे ह्यांत नीचपणा कसला ? राज्यें मिळवायचीं म्हणजे असला नीचपणा करावाच लागतो. मी तर इंग्रजी वखारींप्रमाणें इंग्रजी राज्यही ह्या देशांत स्थापणार व व इंग्लंडप्रमाणेंच इंग्रजी निशाणही ह्या मुलखांत उभारणार !"

* * * * *

ह्यालाही कांहीं वर्षें गेलीं !

कलकत्याजवळ एक बंगला होता. त्या बंगल्यांत एक व्यक्ति एकटीच खेपा घालीत होती. खालीं संत्र्यांचा पहारा होता ! आजूबाजूला पक्का बंदोबस्त केलेला होता.



## प्रकरण १० वें.

त्या व्यक्तीनें एक कपाट उघडलें आणि कपाटाचे खणातून दोन कागद काढले. त्यापैकीं एक कागद पांढरा होता व एक कागद तांबडा होता.

त्या व्यक्तीनें तांबडा कागद काढला व तो पुन्हां पुन्हां वाचला. त्या कागदाचे योगानें त्या व्यक्तीला समाधान वाटलेसें दिसलें!

त्या व्यक्तीनें आनन्दानें टाळी वाजविली! "आतां उमीचन्दाला खुशाल ये ह्मणावें! लेकाला वाटेल तितके रुपये मागूं दे! ते सर्व रुपये ह्या ताबड्या कागदांत लिहिलेले आहेत! पण हा काही कराराचा खरा कागद नव्हे. खऱ्या कराराचा कागद हा पाण्ढरा! ह्या पाण्ढऱ्या कागदवार उमीचन्दाकरितां एक कपर्दिकही लिहिलेली नाहीं! पण-पण--हे जे मी दोन कागद केलेले आहेत त्याची हकीकत माझ्या वरिष्ठ अधिकाऱ्याला कशी कळवूं? तो ही हकीकत ऐकून काय ह्मणेल? तो ह्मणेल-इंग्लडला नको हें बंगालचें राज्य! ताम्बड्यापाण्ढऱ्या कागदांच्या दुटप्पी लबाडीवर मिळविलेलें नको हें इंग्लडला बंगालचें राज्य! त्यापेक्षा इंग्लंड आपल्या वखारी बंगालमधून उठवील! असलें अनीतीचे व अधमपणाचे कृत्य करण्यापेक्षा हिन्दुस्थानातील सर्व वखारी सोडून द्यायला इंग्लण्ड तयार होईल. आह्मी इंग्रज लोक खिस्ती आहो! त्या सत्यप्रिय येशू खिस्ताचे आह्मी अनुयायी आहों. स्पेनच्या आरमारचा धुव्वा उडवून ईश्वरानें आह्मांला सम्भाळलेलें आहे! अनेक क्रान्त्यांतून बचावून नेऊन ईश्वरानें आह्माला भराभराट दिली आहे! राज्यलोभाकरितां आह्मीं इंग्रज लोकांनीं असलें शतंदुष्ट कपटें

करावें ? नाहीं नाहीं—माझा वरिष्ठ अधिकारी ह्मणेल, की नाही. असलें लबाडीचें कृत्य मी कधींही करूं देणार नाहीं ! "

"ठीक आहे तूं करूं नको असलें कृत्य ! पण मी तें करणार ! मी हा पाण्ढरातांम्बडा कागद करून उमीचन्दाला फसविणार व बंगालचें राज्य आह्मा इंग्रज लोकांच्या घशात उतरविणार ! ह्मणे पाण्ढरातांम्बडा कागद करूं नको. अरे, मी पाण्ढरातांम्बडा कागद करीन एवढेंच नव्हे तर मी ह्या कागदावर माझ्या वरिष्ठाची खोटी सही करीन — पण हें बंगालचें राज्य मी मिळवनिच मिळवीन ! राज्य मिळवायचें तेथें नीति कसली ? राज्य मिळवायचें तेथें पाप-पुण्य कसलें ? राज्य मिळवायचें तेथें सदसद्विवेक कसला ? राज्य मिळवायचें तेथें येशू खिस्त कसला ? व राज्य मिळवायचें तेथें परमेश्वर कसला ! मी तर खुद्द परमेश्वरालाही धाब्यावर बसविणार व इंग्लण्डला बंगालचें राज्य मिळावें ह्मणून ह्या कागदावर माझ्या वरिष्ठांची अश्शी खोटी सही ठोकून देणार !

[ क्लाइव्ह उठतो व कागदावर वरिष्ठाची खोटी सही करतो. ]

---

प्रकरण १० वें

( १ ) राजमन्दिरावरही लबाडी असते. साम्राज्यमन्दिरे लबाडी वर उभारलेली असतात.

( २ ) क्लाइव्हनें ताम्बडा-पाण्ढरा कागद केला त्याच वेळी इंग्रज सरकारास राज्य मिळालें.

# प्रकरण ११ वें.

## कुत्रा आणि संन्यासी.



हा ब्रिटिश साम्राज्य स्थापायला क्लाइव्हची लबाडीच कारणभूत झाली हें उघड आहे. ब्रिटिश साम्राज्याचा आज केवढा विस्तार! केवढा भपका! व केवढा दर्जा! पण त्याच्या मुळाशीं मुख्य काय? तर क्लाइव्हची लबाडी, त्यानें केलेले पांढरे ताम्बडे कागद आणि त्यानें बनविलेली खोटी सही!

पण पुढें तरी काय? पुढील गोष्टी तरी नीतिशास्त्राप्रमाणें निर्दोष आहेत काय? नाहींत! पुढेंही ठिकठिकाणीं नीतिशास्त्रावर बोळाच फिरविण्यात आलेला आहे!

वॉरन् हेस्टिंग्जनें चेतसिंगावर केलेला जुलूम, वेलस्लीनें संस्थानिकांच्या कारभारात घातलेला हात, तंजावरच्या वारसा प्रकरणांत इंग्रजांनीं केलेली लटपट, त्यांनीं मीरजाफराचे वंशजांना जबरदस्तीनें दिलेलें पेन्शन्, डलहौसीनें दत्तकांना दिलेली नामंजुरी, सिन्धप्रांत बळकावण्याकरितां केलेली लज्जास्पद लुच्चेगिरी, ह्या गोष्टी काय दाखवितात? ह्यांत नीतिशास्त्राचें पालन आहे असे कोण म्हणेल? बरें!

इंग्रज लोकांनीं इतके वेळ नीतिशास्त्र तुडविलें नसतें तर इंग्रजी साम्राज्य वाढलें असतें असें तरी कोणी ह्मणूं शकेल काय ?

आज इंग्रजी साम्राज्य नीतीचा अभिमान बाळगतें. इंग्रजी साम्राज्यांत न्यायाचा बन्दोवस्त सर्वांत ज्यास्त चांगला राखण्यासाठीं एकसारखा प्रयत्न चाललेला असतो. इंग्रजी साम्राज्यानें युरोपांतील महायुद्धांत केवळ सत्याचे संरक्षणासाठी पुढाकार घेतला. इंग्रजी वसाहतींत काळा--गोरा असा भेद केला जातो त्या वेळीं कित्येक इंग्रज मुत्सद्यांना मनापासून वाईट वाटलें---पण नीतीकरितां एवढी कळकळ बाळगणारें इंग्रजी साम्राज्य ज्या वेळीं स्थापन झालें त्यावेळीं तें अनीतीच्या कृत्यांवरच स्थापन झालें ! नीतीचें संरक्षण करणारें इंग्रजी साम्राज्य नीतीचा खून करूनच प्रस्थापित झालें.

आज इंग्रजी साम्राज्य अनीतीचें आहे असें कोणी म्हणणार नाहीं. आज इंग्रजी साम्राज्य नीतीचा खून करीत आहे असेंही कोणी म्हणणार नाही. पण इंग्रजी साम्राज्य प्रस्थापित झालें ते नीतीचा खून करून झालें ही गोष्ट कशी खोटी ठरेल ? आणि ह्या बाबदींत साक्ष द्यायचा प्रसंग आल्यास क्लाइव्ह. वारन् हेस्टिंग्ज. वेल्स्ली. डलहौसी हे काय साक्ष देतील ?

आज इंग्रजी साम्राज्य शक्य तितकें नीतीचें संरक्षण करीत आहे. आज इंग्रजी साम्राज्यातील न्यायाचीं कोर्टें न्यायाचाच निवाडा करण्यासाठीं बसलेलीं आहेत. इंग्रजी साम्राज्याचे बादशहा श्री. पंचम जॉर्ज ह्यांना तर अनीति, अन्याय किंवा असत्य ह्यांचा वाराही नाहीं. अमल प्रजावत्सल व सद्वर्तनी बादशहा फारच

क्वचित् लाभतो. पूर्वीच्या साम्राज्याचे वेळेपासून तों आतांपर्यन्त श्री. पंचम जॉर्जाइतका नीतिमान् व सदाचरणी बादशहा दुसरा झालेला नाहीं इंग्रजी साम्राज्य स्थापन होत असता जे नीतीचे खून झाले त्याचा श्री पंचम जॉर्ज बादशहा यांच्याशी दूरचा देखील सम्बन्ध येऊन पोंचत नाहीं क्लाइव्ह साहेबाने पाजीपणाच्या गोष्टी केल्या त्याला पंचम जॉर्जनीं काय करावें ? अनीतीला आळा घालून व अन्यायानें उन्मूलन करून श्री. पंचम जॉर्ज हे न्यायसंवर्धनाचे प्रयत्न तनमनधनें करून करीतच आहेत पण क्लाइव्हच्या अनीतीचा श्री. पंचम जॉर्ज ह्यांचेशी सम्बन्ध नाहीं हें जसें खरें, त्याचप्रमाणें हेंही खरें आहे कीं सत्याच्या सरक्षणासाठीं झटणारें इंग्रजी साम्राज्य असत्याच्या पायावर प्रस्थापित झालेलें आहे

ह्या बाबदींत इंग्रजी साम्राज्य व अवरंजेब ह्यांचेमध्यें फार साम्य आहे अवरंगजेबानें लबाडया केल्या ह्मणूनच त्यास राज्य मिळालें. त्यानें लबाडया केल्या नसत्या तर त्याला राज्य मिळालें नसतें. त्याचप्रमाणें क्लाइव्हने लबाडया केल्या ह्मणूनच इंग्रजी साम्राज्य स्थापन झालें. त्यानें लबाडया केल्या नसत्या तर इंग्रजी साम्राज्य कधींही स्थापन झालें नसतें.

पण ह्यांत कांहीं आश्चर्य आहे असेंही नाहीं. सत्याचा पाया असत्य आहे व असत्याचा पाया सत्य आहे सत्य आणि असत्य ह्यांचा असा निकट सम्बन्ध लागूनच गेलेला आहे. सत्यप्रिय ब्रिटिश साम्राज्य असत्याच्या पायावर उभारलें गेलें ह्मणून त्यांत आश्चर्य वाटायला नको. नदीचें मूळ आणि ऋषीचें कूळ कोणी कधींच पाहू नये!

नदीचे मुळाशीं जर एखादा घाणेरडा ओढा सांपडतो तर ब्रिटिश साम्राज्याच मुळाशीं तरी अनीति, असत्य व अप्रामाणिकपणा कां सांपडूं नये ?

आणि ह्याच कारणाकरितां ज्या वेळीं एका कुत्र्यानें श्री रामचन्द्राचे कोर्टांत एका संन्याशाचे विरुद्ध फिर्याद मांडली त्या वेळीं श्रीरामचन्द्रांनीं त्या संन्याशाला "राज्यावर बसण्या"ची शिक्षा दिली ! कारण राज्य म्हटलें कीं तेथें अनीतीचा सम्बन्ध आलाच आणि तो राज्य उपभोगणारा नरकांत गेलाच ! [illegible]शील ब्रिटिश राजे सोडून द्या. पण इतर अनेक राजे कोठें जातील ? ते नरकांतच जाणार ! राजे लोकांचे हातून इतक्या अनीतीच्या व अन्यायाच्या गोष्टी घडलेल्या असतात कीं त्यांना स्वर्गांत स्थान मिळणें शक्यच नाहीं ! स्वर्ग ह्मणजे कांहीं दारूचा गुत्ता नव्हे कीं त्यांत खुशाल अनीतिमान्, अप्रामाणिक व अन्यायी लोकांनीं येऊन बसावें ! स्वर्ग हा नीतिमान् लोकांचा शांतिदत्त आराम आहे. राज्यासाठीं अनीतीच्या लटपटी करणारे राजेलोक स्वर्गांत कोणीकडून येऊन बसणार ?

शकुन्तलेची आणि दुष्यन्ताची गोष्ट घ्या. शकुन्तलेला दुष्यन्तानें आणभाक दिली व त्याचे जिवावर शकुन्तलेनें त्याच्याशीं गान्धर्व विवाह केला. ही आणभाक शकुन्तलेचे लक्ष्यांत होती. ती खरी मानून ती बिचारी दुष्यन्तानें दिलेल्या रत्नमाळेचे मणि ओढीत बसली होती ! पण दुष्यन्त हा राजा होता. तो आपलें

वचन विसरला. आणि खुशाल आपले नगरींत मौजा मारीत बसला. बरें ! शकुन्तला आपले भावास घेऊन त्याच्याकडे आली त्या वेळीं तरी त्यानें आपलें वचन पाळावें कीं नाहीं ? पण तेंही नाहीं. त्या वेळींही त्यानें वचन पाळलें नाहीं. इतकेंच नव्हे तर 'स्त्रीजात तेवढी निमकहराम—खोटें बोलण्याचें त्यांना बाळकडूंच असतें—असली चमत्कारिक बोलणीं त्यानें काढली ! त्याचेपुढें शकुन्तला घाबरून गेली. त्याच्या अकाण्डताण्डवापुढें ती चीत झाली पण तिचे भावास सन्ताप चढला. त्यानें भीडमर्यादा एके बाजूस ठेवली आणि निर्भीडपणानें तो दुष्यन्ताला म्हणाला, [illegible] गोष्टी कुणापुढें सांगता ? ह्या बाता सोडून द्या ! अहो, तुम्हा राजेलोकांनाच खोटें बोलण्याचा सराव ! खोटें बोलणें तुमच्या अंगवळणीं पडलेलें ! खोटें बोलायची तुम्हा राजे लोकांना रोजची कमाई ! खोटें बोलण्याचें तुम्हीं राजेलोकांनी शास्त्र बनविलेलें ! खोटें बोलण्याचे तुह्मी रोज धडे पाठ केलेले ! असल्या तुम्हां राजे लोकांपुढें शकुन्तला म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ! अहो, ही रानावनात वाढलेली व हरिण-बालकांमध्यें खेळलेली ! हिला "खोटें" ह्मणजे काय हें समजावून द्यायचें तरी चार दिवस लागतील ! तेव्हां ह्या बाबतींत मीच काय पण सर्व जग देखील स्पष्टपणानें सांगेल कीं तुह्मी राजे आणि ही वन-कुमारी ह्यांच्यांत तुलना केल्यास ही वनकुमारीच खरी आणि खोटें बोलण्यांत अट्टल असे तुह्मी राजेच खात्रीनें लबाड !"

राजे व लबाडी—राज्य व असत्य—साम्राज्य आणि

आणि लुच्चेगिऱ्या ह्यांचा हा सम्बन्ध आज अनेक शतकापासून लोकांना माहीत आहे. कालिदासाचे वेळेपासून तर तो खात्रीनेच माहीत आहे. आणि कालिदासाला होऊन किती वर्षें झालीं ? कुणाचे मतानें १४०० वर्षें झाली व कुणाचे मतानें २००० वर्षें झालीं ! तुह्मी कोणतेंही गणित घ्या, थोडक्याकरितां विनाकारण भाण्डूं नका—पण एवढें सिद्ध होते कीं सत्य व असत्य ह्यांचा सम्बन्ध आज शतकानुशतकें प्रसिद्ध आहे ! एखाद्या सामान्य मनुष्याचे वचनावर लोक सहज विश्वास ठेवतील—पण एखाद्या राजानें वचन दिलें ह्मटलें की लोक बिचकलेच ! कारण राजा ह्मटला ह्मणजे तो आपलें वचन पाळतोच असें नाहीं. वचन पाळणें अवश्य असलें किंवा वचन मोडणें अशक्य असले तरच राजे लोक आपलें वचन पाळतात, नाहींतर खुशाल वचनभंग करायला तयार होतात ! खोटें बोलणें ह्मणजे त्यांना परसातली भाजी वाटते !

इंग्रजी साम्राज्य हें त्यास अर्थातच अपवाद आहे व श्री. पंचम जॉर्ज बादशाहा ह्यांनाही वचनभंग ह्मणजे काय हें माहीत नाहीं ! पण असलें साम्राज्य अथवा असला सम्राट् ह्मणजे एकटा दुकटाच ! बाकीचीं बहुतेक साम्राज्यें व राजे ह्मणजे खोटें बोलण्यांत अट्टल ! महायुद्धाचे वेळीं तरी मिशाळ जर्मन् कैसरचा इंग्रज सरकारास जो राग आला तोही अशाकरितां कीं तह ह्मणजे “कागदाचीं चिटोरीं” असें तो ह्मणाला. काय धारिष्ट हें ! तह ह्मणजे कागदाचीं चिटोरीं काय ? आपणांसारख्या सामान्य मनु-

ण्यांना असल्या शब्दांचा आचम्बा वाटतो ! इंग्रज सरकाराइतकाच आचम्बा वाटतो ! कारण आपण राजे नाहीं व राजे लोकाइतके आपण खोटें बोलण्यांत बिलन्दरही नाहीं. खोटें बोलण्याची इतकी कला फक्त राजे लोकांनाच साधायची ! तुह्मा आह्मां गरीब लोकांना साधायची नाहीं. देव करो आणि तुह्मीन् आह्मी पुढले जन्मीं राजांच्या जन्माला न येवो ! राजाचे जन्माला आल्यावर आपण कसे बसें राज्य चालवूं. पण राजे लोकांच्या इतकें खोटें बोलणे आप ल्याच्यानें होणार नाहीं ! आमची खात्री आहे कीं आपणावर राजे लोकाचे प्रमाणे खोटें बोलण्याचा प्रसंग आल्यास आपण आपल्या ( पुढल्या जन्मीच्या ) राजवाड्याच्या गच्चीवरून सवाई माधवरावा-प्रमाणें जीव देऊं-- पण प्राण गेला तरी खोटें बोलणार नाहीं.

समाधानाची गोष्ट एवढीच कीं ह्या खोटें बोलण्यास इंग्रजी साम्राज्य व सम्राट् श्री. पंचम जॉर्ज हे सन्माननीय अपवाद आहेत. इंग्रजी साम्राज्यास सत्याची फार आवड आहे व सम्राट् श्री. पंचम जॉर्ज ह्यांचेसारखा सत्यनिष्ठ सम्राट् फार विरळा आहे.

प्रकरण ११ वें

( १ ) लबाड्या केल्यावाचून साम्राज्यें स्थापन होत नाहींत. क्लाइव्हनें लबाडी केली नसती तर इंग्रजी साम्राज्य स्थापन झालें नसतें

( २ ) राज्यांत असत्य असतें ह्मणूनच राज्याअन्तीं नरक असतो. रामचन्द्राचे काळची कुत्र्याची गोष्ट पहा. ( पृष्ठ ७८ )

( ३ ) राजे लोक खोटे बोलण्यात पटाईत असतात असे शकुन्तलेच्या भावाचें मत होते ( पृष्ठ ७९ )

( ४ ) बहुतेक राजे व साम्राज्यें खोटे बोलण्यात अट्टल असतात खोटें बोलणें म्हणजे त्यांना परसातली भाजी वाटते

( ५ ) सामान्य मनुष्याच्या वचनावर लोक विश्वास ठेवतात, पण राजे लोकांच्या वचनावर ते विश्वास ठेवीत नाहीत

( ६ ) कारण वचन पाळणें अवश्य असतें किंवा वचनभग करणें अशक्य असले तरच राजे लोक आपले वचन पाळतात, नाहीं तर खुशाल वचनभग करतात.

( ७ ) ह्या सर्व सिद्धान्तास इंग्रजी साम्राज्य व बादशहा पंचम जॉर्ज हे अपवाद आहेत.



# प्रकरण १२ वें

## गाय ! कुठली गाय !

साम्राज्याचें बुडाशीं दबाड्या किंवा असत्य असणें ही गोष्ट आश्चर्य वाटण्याजोगी आहे खरी, परन्तु नुसत्या अवरंगजेबाच्या उदाहरणावरूनही ही गोष्ट लक्ष्यात येण्याजोगी आहे कीं कित्येक साम्राज्यें केवळ असत्यामुळेंच अस्तित्वात आलेली आहेत, मुळाशीं असत्य नसते तर तीं उभारलीं च गेलीं नसती.

न्यायदानाचें ज्याचें काम ज्याना पहिल्याबरोबर अपराधी लोक लटालटा कापूं लागावे व खरोखरच कापूं लागतात, त्याचा स्वतःचा जन्म अन्याय व अनीति ह्याचेपासून असावा ही गोष्ट सृष्टीच्या अद्भुतपणाचेंच एक उदाहरण समजलें पाहिजे. पण तशी वस्तुस्थिति आहे खरी. कित्येक साम्राज्यें केवळ असत्यावरच उभारलीं गेलीं आहेत व असत्य हेंच त्यांचें आद्य जीवन आहे.

शिकन्दर बादशहाची एक अशी गोष्ट सांगतात कीं एक दरवडेखोर त्याचे समोर पकडून आणला असतां दरवडे घालण्यासारखें निंद्य काम केल्याबद्दल बादशहा त्याची निन्दा करूं लागला. पण तो बादशहास ह्मणाला, सरकार, मला गरीबाला विनाकारण कां नावें ठेवता ? तुह्मी स्वतः माझ्यासारखेच एक दरवडेखोर नाहीं काय ? फरक एवढाच कीं मीं लहान लहान दरवडे घालून

तुमच्या हातात सापडलें व तुह्मी मोठा दरवडा घालून सर्वांचेपेक्षां श्रेष्ठ बादशहा होऊन बसलात.

मि. लॉइड जॉर्जनीं ह्या बाबतींत असेच उद्गार काढलेले आहेत. पूर्वी "लिबरल" पक्षाचे ते अनुयायी असतां व साम्राज्यमदानें त्यांचें डोकें फिरलेलें नसता एकदा अमीर—उमराव व सरदार ह्याचे विषयीं भाषण करण्याचा त्याना प्रसंग आला. त्यावेळीं ते म्हणाले कीं अमीर—उमराव व सरदार हे सर्व चोरांचे व दरवडेखोरांचे बच्चे आहेत. त्यांची सम्पात्ति ही सारी भामटेगिरीची मिळकत आहे व त्याच्या पूर्वजांपैकी प्रत्येक इसम हा जिथें भेटेल तिथें सुळीं देण्याच्या लायकीचा आहे.

पूर्वी रोमन् साम्राज्याच्या काळीं रोमच्या एका सरदाराने इंग्लण्डचे राजास पकडलें व त्यास कैद करून रोमच्या बादशहापुढें नेलें. रोममधील वैभव व अतुल सम्पत्ति पाहून इंग्लण्डचा राजा चकित होऊन गेला तो जरी राजा होता तरी इतकी सम्पत्ति त्याने कधींही पाहिली नव्हती त्यावेळी त्यानें असे उद्गार काढले की ' एवढी राजलक्ष्मी भोगत असताही माझ्या गरीबाच्या कंगाल देशावर रोमच्या बादशहाचें लक्ष आहेच अ ! हे ! काय हा लोभ ! "

पण हे एवढेच काय ? अशा प्रकारचे अनेक उद्गार आहेत व त्या सर्वांचें तात्पर्य एकच आहे कीं राजा हा चोरांना शासन करतो ह्मणून तो साव आहे असें समजूं नका. राजा हा त[illegible]वींत

पोटा चोर ! इतर चोर कांहींतरी बरे ! पण हा अट्टल चोर चोऱ्या ेर करतोच, पण त्यावर न्यायाचे व सत्याचें पांघरूण टाकतो.

तथापि प्रत्येक नियमाला अपवाद हे असतातच आणि त्याप्रमाणें ह्या नियमालाही अपवाद आहेत. ह्या नियमाला मोठे अपवाद म्हणजे इंग्रजी साम्राज्य व इंग्रज सम्राट् श्री. पंचम जार्ज हे होत. हे मात्र नसे नाहींत. पण ह्यांचेशिवाय बहुतेक साम्राज्यें म्हणजे चोर अथवा चोराचे गुरु आहेत.

म्हणजे एवढा प्रवास करून आपण पुन्हा मूळ मुक्कामाला आलों की ह्या जगातील प्रत्येक मनुष्य चोर आहे. आपण मजुरापासून राजापर्यन्त व सांसारिकापासून तों साधूपर्यन्त प्रत्येकाचें चारित्र अवलोकन केलें. त्यात आपणांस एवढेच आढळले कीं आपण सर्व चोर आहोंत आपणापैकीं एकही मनुष्य सचोटीचा नाहीं. ह्या जगात् "तुम भी झूटे, हम भी झूटे" हेच खरे !

पण असें का असावें ? सत्याची आपणास आवड का नसावी ? सत्य मार्गानें जावें असे आपणांस का वाटू नये ?

वाटत असतें. तसें आपणास वाटत असतें. अगदी लहानपणापासून आपणास सत्याचा उपदेश चाललेला असतो. असत्याने चालावें व असत्यच आचरावें असे खरोखरी वाटणारा मनुष्य हरिश्चन्द्राइतकाच विरळा असतो. असा मनुष्य लाखांतून एखादा ! बाकी सर्वांची इच्छा सत्य आचरण्याचीच असते.

पण असे असताही आपणास असत्य खेचून नेत असतें. आपण सत्याची इच्छा करीत असताही आपण असत्य बनत असतो. असत्य आचरीत असतों असत्यापुढें आपला इलाजच चालत नाही.

आपण सत्यवादी असल्याची ज्या कुणास घमेण्ड असेल ती असो, पण आह्मी त्याना एकच सवाल करतो की कोणतेही २४ तास घ्या व ह्या २४ तासात तिळमात्र खोटें बोलल्यावाचून वर्तन करून दाखवा. तसें तुह्मी वर्तन केलें तर तुमची घमेण्ड खरी. नाहीं तर दूधवाल्या भय्याची व तुमची किंमत सारखीच.

तुह्मी आपले घरीं असला व तुमच्याकडे एखादा मनुष्य भेटायला आला आणि त्यानें तुह्मास विचारलें की का ? फार कामात आहात वाटतें ! तर तुह्मी काय त्यास हिरवटपणाने असे उत्तर द्याल कीं हो, हो, मी फार कामात आहे. तुह्मी आला तसे चालते व्हा पाहूं.

नाहीं. तुह्मी असें करणार नाही. तुह्मी कितीही कामात असला तरी आपलें काम तुह्मी एक मिनिटभर दूरच ठेवाल व ह्मणाल की "नाहीं, मी कांहीं तसा विशेष कामांत नाही. आमचें रोजचें काम चाललेंच आहे ! पण आपल्याला काय पाहिजे सांगा बरें" '

आणि त्याचें काम जर थोडक्यात होण्याजोगे असेल तर तुह्मी तें ताबडतोब कराल आणि ते तसें होण्याजोगें नसेल तर तुह्मी त्यास सांगाल कीं सध्यां माझ्या हातांत थोडेसे काम आहे, तें सम्पूं द्या. तें सम्पलें कीं मी तुमचें काम खात्रीने करीन.

ह्यात तुह्मी थोडेसें तरी खोटें बोलतां, नाहीं काय ? आणि तुह्मी तसे बोललां ह्मणून समाज तुह्मास नांवें ठेवील काय ?

दुसरें उदाहरण घेऊं. तुम्ही प्रवास करीत आहा व वाटेनें तुम्हास खायला प्यायला काहींएक मिळालेलें नाहीं. आपले मुक्कामीं तुह्मी दुपारी २।३ वाजता पोचला व ज्याचे घरीं तुम्ही उतरलां त्याची पत्नी आजारी आहे असें तुम्हांस दिसले. तुम्हास त्या गृहस्थानें विचारले की " का ? जेवायचें आहे ना ?"

तुम्ही पहात आहा कीं त्या गृहस्थाचे घरीं अडचण आहे. ह्या वेळी आपण "हो" ह्मटलें तर त्या गृहस्थाला स्वतःतरी सैपाक करावा लागेल अथवा आपल्या आजारी असलेल्या बायकोला उठवून त्रास द्यावा लागेल. अशा वेळीं तुम्ही काय उत्तर द्याल ? "होय. मला जेवायचे आहें" असे म्हणाल कीं "नाहीं, मी जेवून आललो आहे" असें म्हणाल ? तुम्ही खात्रीनें असें म्हणाल कीं "मी जेवून आलेलों आहें." निदान "वाटेनें मी खूप फराळ केलेला आहें" असे तरी तुम्ही सागाल. तुमचे पोटात कितीही भूक लागलेली असली तरी दुसऱ्याला त्रास होऊ नये ह्मणून तुम्ही ह्याप्रमाणेंच उत्तर द्याल व हें बोलणें खोटें आहे कीं काय ह्याबद्दल तुम्ही परवा करणार नाही.

आणखी एक उदाहरण घेऊं. तुमचे शेजारी एक गृहस्थ रहात आहे व तो आजारी आहे. त्यास पहाण्यास डाक्टर आलेला आहे व त्यानें त्याची तब्येत पाहून तुमचे कानांत सांगितलें आहे कीं "दुखणें असाध्य आहे. ह्यांतून हा वांचणें शक्य नाहीं."

घरांत फक्त त्याची पत्नी आहे व त्यास मूलबाळ वगैरे कोणी नाहीं. तुमची खात्री आहे कीं डॉक्टर काय बोलला हे तिला कळलें कीं ती हंबरडा फोडील व तो रोगीही उद्यां मरणार असला तर त्या धक्क्यानें आजच मरेल

अशा वेळीं तुम्ही तिला काय सांगाल ? डॉक्टर जसें बोलला तसेंच सांगाल काय ? नाहीं, तुम्हीं त्यांत प्रकारान्तर कराल. तुम्ही म्हणाल कीं डॉक्टरानीं त्यांना फार जपायला व अतिशय काळजीनें औषध द्यायला सांगितलेलें आहे. खरी जपायची वेळ ही आहे. ह्या वेळीं थोडीशी हयगय झाली तर दुखणें उलट खाईल

आतां हें सांगणें खोटें आहे. पण तें खोटें तुम्ही आनन्दानें पत्क-राल. कारण तुम्हांला माहीत आहे कीं ह्या वेळीं खरें सांगायचें म्हणजे रोग्याकडे मृत्यूला बोलावून आणण्यासारखें आहे.

अशीं आणखी शेंकडों उदाहरणें देता येतील ह्यात मनुष्य खोटें बोलतो व तें जाणून बुजून बोलतो. पण त्यात त्याचा उद्देश परो-पकाराचा असतो. निदान दुसऱ्याचा त्रास वाचावा. त्याचें काम व्हावें किंवा त्यास आराम व्हावा असा उच्च उद्देश त्याच्या ह्या खोटें बोलण्यांत असतो.

अशा वेळीं गाईचें उदाहरण नेहमीं देत असतात. एक कसाई सुरा घेऊन गाईचे मागें लागला. ती पळाली आणि जीव बचावण्या-साठीं एका बोळांत शिरली. वाटेंत त्यास तुम्ही दिसला. तुम्हाला त्यानें विचारलें कीं “ रावसाहेब, इकडून एखादी गाय गेली कां?”

तुम्हीं त्या गाईला पाहिलेली आहे व ती कुठें शिरली हें तुम्हास माहीत आहे. तो कसाई आहे व तिचा जीव घेण्याकरितां तो तिची चौकशी करीत आहे हेही तुम्हांला ठाऊक आहे. अशा वेळीं तुम्ही काय कराल? "गाय ह्या बोळांत शिरली" असें सांगाल कीं कानावर हात ठेवाल आणि ह्मणाल कीं " गाय ? कुठली गाय ? इकडे गाय येताना तर मी मुळींच पाहिलेली नाहीं."

तेंव्हा मनुष्य खोटें बोलतो तें नेहमीं वाईट उद्देशानेंच बोलतो असें नाहीं. कित्येक वेळां तो अतिशय उच्च उद्देशानें खोटें बोलत असतो. त्यांत केवळ दुसऱ्याचाच फायदा असतो. त्याचा स्वतःचा कांहींच फायदा नसतो. किम्बहुना तो तसें खोटे न बोलेल तर दुसऱ्याचा तोटा होण्याचा सम्भव असतो अशा वेळीं "खरें बोला" "सत्यं वद" असें कोणतें नीतिशास्त्र सागेल ? अशा वेळीं नीतिशास्त्र अगदी स्पष्टपणें असाच आग्रह करील की " खोटें बोला, " " बेधडक खोटें बोला, " " ह्या वेळीं जितकें खोटें बोलाल तितकें तुह्मांला जास्त पुण्य लागेल. "

आणि ह्मणूनच " कुणाचें लग्न जमत असेल तर तिथें खोटें बोलायला हरकत नाहीं " वगैरे समजुती प्रचारात आहेत. ह्या समजुती खऱ्या असोत किंवा नसोत, पण ज्यांत दुसऱ्याचें प्राणरक्षण किंवा दुसऱ्यावर उपकार आहे अशा ठिकाणी मनुष्यें खोटेच बोलणें पसन्त करणार हे उघड आहे. ह्याबद्दल नीतिशास्त्र त्याची पाठच थापटील आणि सर्व लोक त्यांना शाबासकीच देतील. आणि

हें उघडच आहे ही केवढीही पुण्यत्वाची गोष्ट असली तथापि परोपकाराचें पुण्य सत्य इतर सर्व पुण्यांपेक्षा ज्यास्त आहे. सर्व धर्म परोपकारात आहे. सर्व नीति परोपकारात आहे सर्व परमेश्वरी गुण परोपकारात आहेत

---

**प्रकरण १२ वे.**

( १ ) राजा म्हणजे सर्वांत मोठा दरवडेखोर, असें शिकन्दर बादशहास एकाने बजावले होते.

( २ ) सर्व अमीर-उमराव हे दरवडेखोराचे बच्चे आहेत असे लॉइड जॉर्जनीं एके ठिकाणीं म्हटले आहे.

( ३ ) मनुष्याची साहजिक इच्छा खोटें बोलण्याची नसते पण त्यास असत्य खेचून नेत असते.

( ४ ) कित्येक वेळा मनुष्यास असत्य बोलावें लागते. असत्य बोलणें हें त्याचे कर्तव्य होऊन बसतें.

( ५ ) परोपकार हें त्यापैकींच एक कारण होय. परोपकारास्तव मनुष्य खोटें बोलला तर तें प्रशंसनीय आहे.



# प्रकरण १३ वें.

## औंधकरांची "बेबन्दशाही"

नाटक हे काय आहे? नाटक म्हणजे खोटा देखावा! नाटकवाले काय करतात? नाटकवाले जे नाही तें करतात व जे आहे ते मात पडद्याच्या पलीकडे दडवितात. नाटकवाल्याच्या पुढें शर्थ आहे! नाटकवाले म्हणजे ब्रह्मदेवाचे आजोबा! ब्रह्मदेवाने वाटेल ते केले तरी त्याचेही कान पकडायची ह्याची तयारी! ब्रह्मदेव चार तोण्डाचा आहे असे म्हणतात! पण तो चार तोण्डांचा उगीच नाही. त्याला नाटकवाल्याचेकडून जेव्हा थडाथड थोबाडींत मिळाल्या त्या वेळी त्याच्या एका गालाची चार गालफडें झाली!

नाटकवाल्याचे पुढें ब्रह्मदेव रडकुण्डीला येईल तर नवल नाही! त्याची काहीच रचना ते टिकूं देत नाहीत. त्यांची सगळी गणितें ते चुकावितात! नाटकवाल्याच्यापुढें त्याला आपली चोपडी बन्द करून शेषशायीच्या नाभिकमलात विश्रान्ति घेण्यासाठी बॅक्बेवर जीवच द्यावा लागतो.

एकदा ब्रह्मदेव ग्रॅण्टरोडवर आला आणि त्याला "बेबन्दशाही"ची पाटी दिसली. त्याला आश्चर्य वाटलें. त्याला वाटलें की सप्त स्वर्ग आणि सप्त पाताळ ह्या सर्वांपर्यन्त अखिल विश्वाचें नियमन करणारा मी व माझा अवतार विष्णु आणि शंकर हे बसलेले

असूनही ह्या जगांत बेबन्दशाही माजते अं ! अरे कोण आहे रे तिकडे ?

मी, मी आहे तो—एक कृष्णवर्ण, ठेंगणीशी व वाटोळी आकृति ह्मणाली.

तूं ? तूं कोण ?

मेहेरबानी करून "अरे तुरं" करूं नका. ही कांहीं पुण्याची म्युनिसिपालिटी नव्हे. हें ग्रॅण्टरोड आहे. ग्रॅण्टरोडवर असली असभ्यपणाची भाषा चालायची नाहीं

अहो, पण—

ह ! आता खुशाल काय विचारयचें आहे तें विचारा

अहो, इथें "बेबन्दशाही" कुणीं केलेली आहे !

"बेबन्दशाही" कुणीं केलेली आहे ! महाराज, आपण कुणी नवे दिसतां. निदान आपण "मौज" पत्र वाचीत नाहीं असें दिसतें अहो, ही "बेबन्दशाही" रा ग. विष्णुपन्त औन्धकर ह्यानीं केलेली आहे.

काय? विष्णुपंत औन्धकर ह्यानीं ही बेबंदशाही केलेली आहे ? ब्रह्मदेवाचा आवाज 'हॅमलेटमधील' गणपतरावांप्रमाणें चढायला लागला.

समोरील आकृतीला वाटलें कीं हा कुणीतरी पोलीस अधिकारी असावा अथवा प्रेक्षकांची मोजदाद करणारा टॅक्स–कलेक्टर असावा ! हा कांही ग्रॅण्टरोडवरील " दादा " दिसत नाही. ह्याचे शांतवन करायला ह्याला आंतमध्यें घेऊन जावें हें बरें !

# प्रकरण १३ वें

ब्रह्मदेव आणखीही कांही चढत्या आवाजात बोलणार इतक्यांत त्या आकृतीने त्यास आंत नेले. बरे झाले कीं ब्रह्मदेव आपले फक्त एकच तोण्ड बाहेर दाखवीत होता. तो जर आपल्या चार तोण्डांनीं नाटक पाहायला बसला असता तर खाशाबाच्या ऐवजी त्याच्या तोण्डाचा चौथरा पहाण्याकडेच लोकांचे लक्ष्य वेधलें असतें

ब्रह्मदेव खुर्चीवर बसल्यांनतर काही वेळ स्टेजवर खाशाबा वगैरेच पात्रें होती, पण नन्तर कलुशा कबजी आला, सम्भाजी महाराज आले, नन्तर सम्भाजीची पत्नी येसूबाई हीही आली. ब्रह्मदेव बुचकळ्यांत पडला. त्याची खात्री होती कीं ही सर्व माणसें मेलेली आहेत. सम्भाजीचे डोळे फोडून व जीभ तोडून अवरंगजेबाने मारल्याचे त्याला पक्कें आठवत होते. पण आता हीं सर्व माणसे त्याचेपुढें वावरत होती. ब्रह्मदेवाला कांही समजेना ! तो गोन्धळला ! त्याने आपली डायरी काढली. आणि डायरीत त्याचे कल्पनेप्रमाणेंच नोन्द सापडली. खरोखरच सम्भाजी १६८९ मध्यें अवरंगजेबाचे हातून मेलेला होता

काय ? कुठे आहे तो औधकर ? मेलेलीं माणसें तो पुन्हा जिवन्त करतो काय ? हा काय घोटाळा आहे ? आह्मां देवाचे जन्ममृत्यूचें काम ह्या औधकरांनीं आपल्या हातांत घेतल्यावर मग आह्मी देव कशाला ?

ब्रह्मदेव सन्तापला ! तो पुन्हां ओरडला, कुठें आहे तो औधकर ? असे तो पुन्हां पुन्हा विचारूं लागला. पण त्याला असें उत्तर

मिळाले कीं औधकर सध्या कामात आहेत. अजून त्यानीं रं''
पुसलेला नाहीं.

ब्रह्मदेव उठला व समोरील इमारतीत गेला. ही इमारत ह्मणजे अर्थात्च रिपन् थिएटर होते. तेथे "नन्दकुमार" नाटक चाललेले होते. तेथेही डोअरवरील मनुष्यानें त्यास आदबीने आत नेले व खुर्चीवर बसविले. तो इतक्यात " राधा " पुढे आली

राधा ? ही राधा ? राधा तर कधींच मुक्त होऊन गेलेली आहे. तिच्या अगाध प्रभुप्रेमामुळें ती मुक्त होऊन गेल्यास पचवीस तीस शतके झालेली आहेत. आता ही राधा इथें कशी ? हा काय चमत्कार ! तिकडे मेलेला सम्भाजी खुशाल बायकोशी भाषण करतो व इकडे मुक्त होऊन गेलेली राधा पुन्हा कुंजवनात येते ! काय हा चमत्कार !

ब्रह्मदेवाला वाटले कीं आपल्याला भ्रम झाला आहे ! आपलें डोकें ठिकाणावर नाहीं ! शंकराच्या नादानें आज जरा ज्यास्त झाली आणि त्यामुळेंच भलतें भलतें दृष्टीसमोर दिसायला लागलें.

ब्रह्मदेवांनीं आपला हातरुमाल काढला आणि आपल्या दृष्टीवरून फिरविला. पण त्याचें दृष्टीसमोरून राधा हालेना ! शेवटीं जवळ बसलेल्या शेटला त्यांनीं विचारलें, ही कोण ?

शेटनें उत्तर दिलें—ये नारायणराव राजहंस ! ये बाईलोकचा पार्ट लई चांगला करते, आणि गाते बी चांगला ! ह्याला समदे लोक बालगन्धर्व ह्मणते.

कोण ह्मणालांत आपण ?

नारायणराव राजहंस ! इथल्या समद्या लोकांना माहीत आहे ये ! आपण कुठनं बाहेरगामर्शी आले वाटते !

पण ब्रह्मदेवानें त्याच्या बोलण्याकडे लक्ष्य नव्हते. त्यानें पुन्हा डायरी काढली ! त्यांत त्याला आढळून आलें कीं नारायणराव राजहंस---जन्म १८८८---पुरुष!

काय हा पुरुष आणि हुबेहुब बायको बनतो ! आमची ह्यानं फजीतीच करून टाकली म्हणायची ! आह्मी ह्याला पुरुष केलें, पण ह्यानें बायकोचा असा आविर्भाव केला कीं खरोखरीच राधा मागें पडली--छे आपण इथें उभे राहता उपयोगी नाहीं ! इथून पळ काढला पाहिजे. नाहींतर हे लोक मलाच पकडायचे आणि नाहीं तो वेष मला द्यायचे !

आणि ब्रह्मदेवानें लगेच पाय काढला ! . लगेच त्यानें बॅकबेचा रस्ता पकडला. त्यानें पुन्हा शेषशायीचे नाभिकमलांत दडी दिली आणि तेव्हांपासून पुन्हां कधींही नाटकवाल्यांना तोण्ड दाखविलें नाहीं !

अशा रीतीनें नाटकवाल्यांनीं सर्वांत मोठें असत्य जगांत आणलेलें आहे. त्यांनीं पडद्याला रंगमहाल बनविलेलें आहे व नळ्यांच्या बन्दुका केलेल्या आहेत. त्यांनीं फळ्यांचे राजवाडे बनविलेले आहेत आणि फुलांचे स्वर्ग बनविलेले आहेत. त्यांनीं मेलेलीं माणसें जिवन्त केलेलीं आहेत व पुढें जन्मणारीं माणसें आजच जन्माला घातलेलीं आहेत. त्यांनीं रंकांना राजे केलेले आहेत व सांसारिकांना

साधु केलेलें आहे. त्यांनीं सद्गुणी लोकांस मद्याचा पेला दिलेला आहे व मद्यपी माणसांना तुकारामबोवा बनविलेलें आहेत. त्यांनीं जाजमांवर पानिपतच्या लढाया केलेल्या आहेत व कापडावर दण्डकारण्य उभें केलेलें आहे ! नाटकवाल्यानीं काय केलेलें नाहीं ! कोणतें असत्य करायचे नाटकवाल्यानीं ठेवलेलें आहे ?

पण हें असत्यही शिक्षेला पात्र नाहीं. परोपकारासाठीं केलेलें असत्य हें जसें शिक्षेला पात्र नाहीं, त्याप्रमाणे मनोरंजनासाठीं किंवा थट्टा व विनोद ह्यासाठीं केलेलें असत्यही शिक्षेला पात्र नाहीं. उलट तें स्तुतीला पात्र आहे. असल्या असत्याचे योगानेंच जग उन्नतीला पोंचलेले आहे, रमणीय झालेलें आहे, प्रेमाचें व आनन्दाचें निधान बनलेलें आहे! ह्या असत्याला कोण शिक्षा करील ?

आणि ह्याच असत्यात शिक्षणाकरिता, बोधाकरिता किंवा उदाहरणाकरितां केलेल्या असत्याचा अन्तर्भाव होतो. आपल्याला माहीत आहे कीं पंचतन्त्रातील प्रत्येक गोष्ट खोटी आहे व ईसापच्या कल्पित कथेप्रमाणें एकही कोल्हा कधीं सिंहाशीं बोललेला नाहीं. पण ह्या असत्याकरितां विष्णुशर्मा किंवा ईसाप ह्याना कोणी फाशीं देईल काय? नाहीं, कारण त्यांनीं हें जें असत्य केलं तें शिक्षणाकरितां केलें, बोधाकरिता केलें, अज्ञानी लोक सज्ञान व्हावें ह्मणून त्यानीं ससे, आणि बेडूक, बैल आणि हरिण, कोल्हा आणि सिंह यांस एकमेकांशी बोलायला लावलें.

आणि गोखल्यानीं जे आपल्या अंकगणितांत लिहिलें आहे तें ? होय! तेंही ह्यां पैकींच असत्य ! तें उदाहरणांकरिता आणलेलें असत्य ! चार

माणसांनीं वीस दिवसपर्यन्त रोज आठ तासप्रमाणें काम केलें, असें गोखल्यांनी अंकगणितांत लिहिल्याबरोबर कोणीं त्यांचेकडे जाऊन अशी तक्रार केली काय ? कीं गोखले साहेब, तुह्मी एवढे सत्यवादी ह्मणविता आणि प्रामाणिकपणाच्या गप्पा मारतां—मग कोणत्या चार माणसांनीं वीस दिवस काम केलें तें एकदा दाखवा बरें ! नाहीं तर करतो तुमच्यावर खोटें बोलण्याबद्दल फिर्याद आणि येतों घेऊन वारण्ट !

अशी तक्रार कोणी केलेली असणे शक्यच नाहीं ! कारण उदाहरणाकरिता असत्य बोलणें हें पाप नव्हे. उलट तें जरूरीचें व हिताचें आहे.

---

**प्रकरण १३ वें.**

( १ ) मनोरंजन, थट्टा, विनोद ह्यातील असत्यही शिक्षेला पात्र नाहीं. नाटकें हें ह्याचें उदाहरण होय.

( २ ) शिक्षण किंवा बोध ह्यासाठीं आचरलेलें असत्य शिक्षेला पात्र नाहीं.

( ३ ) अंकगणित, व्याकरण वगैरे शास्त्रीय विषयांत उदाहरणार्थ प्रीत्यर्थ घेतलेलें असत्य शिक्षेला पात्र नाहीं.

# प्रकरण १४ वें.

## अफझुलखानास सॉलीसिटरची नोटीस.

—.0.—

आणखीही एक प्रकार असा आहे कीं जेथें असत्य साहजिक आहे. ज्या वेळीं दुर्बळांचा प्रबळांशीं सम्बन्ध येतो व प्रबळाकडून कोणत्याही प्रकारची क्षमा होण्याचा सम्भव नसतो, त्या वेळीं मनुष्य सहजच असत्याच्या दुर्भेद्य किल्ल्यांत शिरून आपला बचाव करण्याचा प्रयत्न करीत असतो.

ह्या जगांत अनेक प्रकारचे किल्ले आहेत आणि त्यात कमीज्यास्ती प्रमाणानें बचावाचा बन्दोबस्त केलेला असतो. पण ह्या सर्व किल्ल्यांत असत्यासारखा बळकट किल्ला दुसरा नाहीं. मनुष्य नडला कीं तो ह्या किल्ल्यांत शिरतो आणि तेथें त्याला बचावाची खात्री वाटते.

पण मनुष्यच काय, प्रत्येक जीव असत्याच्या अभेद्य किल्ल्याचा शोध करीत असतो. जगांत परमेश्वर जितका दुर्बळाचा वाली, तितकेंच असत्य हेंही आहे. ह्या असत्याचा आश्रय दुबळ्या जिवाना तारतो. ह्या असत्याचा आश्रय त्याना सुरक्षितपणा व जीवदान देतो.

शिकारी पाठीस लागला किंवा एखादें हिंस्त्र जनावर रोख धरून येऊं लागलें ह्मणजे कित्येक प्राणी मेल्याचें सोंग घेऊन पडतात आणि ह्या युक्तीनें त्यांचा बचावही होतो. शिकारी लोक मेलेल्याला

मारीत नाहींत. हिंस्र प्राण्यांनाही मेलेल्या जिवाला मारणें कमीपणाचें वाटतें. तीं त्याला सोडून देतात व धांवत्या जिवाचे पाठीमागे धांवत सुटतात.

जर मुक्या प्राण्यांनासुद्धां ह्याप्रमाणें असत्याच्या आश्रयानें जीव बचवावासा वाटतो तर बुद्धिवान् मनुष्यप्राणी ह्या युक्तींचा किती उपयोग करीत असेल ! अतिशयच !

शत्रूला दाखविण्याच्या हुलकावण्या ह्या काय आहेत ? हुलकावण्या म्हणजे असत्य ! त्यात खोटेपणाचाच प्रकार असतो. पण तो सर्व अवश्यक मानला जातो. त्याबद्दल कोणी कोणाला नांवें ठेवीत नाही. किम्बहुना ह्या हुलकावण्या दाखविण्याच्या युक्त्या जो कोणी ज्यास्त काढील त्याची ज्यास्त प्रशंसा होते.

बैलांच्या शिंगांना मशाली बान्धून शत्रुसैन्याला भलत्याच दिशेनें नेल्याचीं कितीतरी उदाहरणें इतिहासात आहेत ! पण त्याबद्दल त्याना कुणीं नावें ठेवलेलीं नाहींत ! उलट त्यांची प्रशंसा झालेली आहे व त्याची नावें इतिहासांत कायमचीं मुद्रित होऊन बसलेली आहेत !

युद्धशास्त्र हें ह्याप्रमाणें बहुतेक असत्याचें व लबाड्याचे शास्त्र आहे. जो जितका ज्यास्त लबाड्या काढील तो युद्धशास्त्रांत ज्यास्त प्रवीण ! युद्धांतले " व्यूह " ह्मणजे काय ? लबाड्याचेच प्रकार ! मग ते द्रोणाचार्यांनीं केलेले असोत किंवा जनरल फॉकनीं केलेले असोत !

पर्वाच्या महायुद्धांत इंग्रजांचे अंगावर जर एखादी मोहीम शेकली असेल तर ती डार्डेनलीसची होय ! ह्या मोहिमींत तुर्कांना तर शह मिळाला नाहींच, पण इंग्रजी सैन्याची मात्र तिरपीट उडाली ! त्या वेळीं माघार खाऊन इंग्रजी सैन्याला बचावून आणणें अतिशय कठिण होतें. इंग्रजी सैन्य परत जाणार आहे एवढी नुसती कुणकुण जरी तुर्की सैन्याच्या कानावर गेली असती तरी तुर्की सैन्यानें त्याचा सफ्पा उडविला असता. ह्या वेळी तुर्की सैन्याला भ्रमात ठेवून आपलें सैन्य हालविणेंच इंग्रज सेनापतींना भाग होतें. आणि तें त्यानीं फार कुशलतेनें केलें ! पण ही कुशलता ह्मणजे काय ? लबाडीच ! परन्तु अशी लबाडी केल्याशिवाय गत्यन्तर काय ? प्रबळाशीं गांठ पडली ह्मणजे दुर्बलांना लबाडीच तारून नेते. तेथें सत्य पाळणें ह्मणजे सर्वस्वाचा नाश करण्यासारखेंच आहे.

आणि जिथें इंग्रजी सेनापतींच्या अशा युक्त्या-ऊर्फ लबाड्या-तिथें अफजुलखानाच्या समोर शिवाजी वाघनखें घालून गेला ह्यांत इतकें आश्चर्य वाटण्याजोगें काय आहे ? पण त्याबद्दल केवढाले आरोप व त्यांची केवढी वाच्यता ! परन्तु जिथें दुर्बळाची प्रबळांशीं गांठ पडते तेथें असें करावेंच लागतें. प्रबळ मुसलमानी सत्तेपुढें संख्येनें, सम्पत्तीनें व सामर्थ्यानें कमी असलेला शिवाजी दुसरें काय करील ? " मी तुमचा अमुक वाजून अमुक मिनिटांनीं खून करणार आहें, तर त्या वेळीं प्रतापगडावर या " अशी सॉलिसिटरची नोटीस तो अफजुलखानास पाठवील काय ?

गनीमी कावा, गनीमी कावा ज्याला ह्मणतात तो तरी ह्याच! गनीमी कावा ह्मणजे हुलकावण्या, युक्त्या उर्फ लबाड्या! गनीमी काव्याचा उपयोग केव्हां करतात? ज्यावेळीं प्रबळ शत्रूशीं गांठ पडेल तेव्हां करतात. इतर वेळेला करीत नाहींत. प्रबळ मुसलमानी सत्तेनें हिन्दुस्थान व्यापलें आणि शिवाजीजवळ तर साधनें अगदीच कमी, ह्मणून त्याला गनीमी कावा करावा लागला. इंग्रज लोकांनीही नेपोलियन्शीं पोर्तुगालमध्यें गनीमी कावा केला. इंग्रज लोक असें न करते तर नेपोलियन्नें केव्हांच त्यांची चटणी करून टाकली असती. जें शिवाजीनें केलें, तेंच इंग्रजांनीं केलें. जें इंग्रजांनीं केलें, तेंच शिवाजीनें केलें! त्यांत इंग्रज तेवढे साव व शिवाजी तेवढा चोर असें कोण ह्मणेल?

पण एवढेंच काय? सरकारनें डिटेक्टिव्हांचें खातें जें ठेवलेलें असतें तें तरी काय असतें? तेंही लबाडीचेंच खातें असतें. पण अशा लबाड्या केल्यावांचून सरकारचें भागत नाहीं. जे जुगारी लोक चोरून जुगार खेळतात किंवा दरोडेखोर चोरून दरवडे घालायचे बेत करतात त्यांच्या कळपांत सरकारनें आपले शिपाई कांहीं युक्त्या करून जर न पाठविले तर तीं त्यांचीं दुष्कृत्यें बाहेर कशीं येतील? कधीं येणार नाहींत. सरकारी शिपाई येत असल्याची त्यांना नुसती चाहूल लागली तरी ते सर्व साफसूफ करून बसतील अथवा त्या सरकारी शिपायांचा निकाल करून टाकतील. ह्मणून त्यांना जें जाळ्यात गोवायचें तें अनेक युक्त्याप्रयुक्त्या करूनच गोंवावें लागतें. त्या

वेळीं डिटोक्टिव्हांना जुगारी बनावे लागते, दरवडेखोरांचा वेष घ्यावा लागतो, चोरीचा माल विकत घ्यायची दुकाने घालावी लागतात, साधु व्हावे लागतें, ज्योतिषी बनावे लागते—वाटेल ते करावे लागतें. कारण त्या वेळेपुरते तरी ते दरवडे॰ोर प्रबळ असतात. त्यांना युक्तीनें पकडल्याशिवाय गत्यन्तर नसतें.

युद्धशास्त्र हें लबाडीचें शास्त्र आहे. डिटेक्टिव्ह शास्त्र हेंही लबाडीचें शास्त्र आहे. राजकारण हेही बऱ्याच अंशी लबाडीचें शास्त्र आहे. राजकारणांत दुसऱ्याच्या मनांतले बेत ओळखायचे म्हणजे ते त्याच्या शब्दावरून ओळखून भागत नाहीं. ते युक्त्या करूनच ओळखून घ्यावे लागतात. कारण राजकारणी पुरुषाच्या चेहेऱ्यावरील हास्य ह्मणजे प्रेम नसतें किंवा प्रसन्नता ह्मणजे आनन्द नसतो. कित्येक वेळा ह्याच्या अगदीं उलट प्रकार असतो. ह्या हास्यामुळें फसून किती तरी लोक तुरुंगांत पडलेले आहेत व ह्या प्रसन्नतेवर विश्वास ठेवून कितीतरी लोकानी आपले प्राण गमावलेले आहेत !

कित्येक लोकांना वाटतें कीं असत्य हे ठक व लफंगे लोक ह्यांचेच शस्त्र आहे. पण आतांपर्यंत आपण जें विवेचन केलेले आहे त्यावरून हे खरें आहे असें कोण म्हणेल ? असत्य हा एक किल्ला आहे. हा एक अत्यन्त प्रबळ किल्ला आहे. तो अशक्ताना आश्रय देतो व आणीबाणीचे वेळेस त्यांचे प्राण बचावतो. असत्याच्या किल्ल्यामुळेंच इंग्रजी सैन्य डार्डेनलीसमध्यें बचावलें ! असत्याच्या

किल्ल्यामुळेंच नेपोलियन्च्या माऱ्यापुढे इंग्रजी सेनेचा बचाव झाला. असत्याच्या किल्ल्यात शिरूनच इंग्लण्डचा आल्फ्रेड राजा एकतारी वाजवीत शत्रूच्या गोटात शिरला व त्याना गायनाने भुलवून त्यांच्या गुप्त बातम्याचा शोध लावून आला !

आणि ही जर आलफ्रेड राजाची गोष्ट, तर सासूपुढें सून खोटें बोलली किंवा माराच्या धाकानें शाळेंतल्या मुलानें पन्तोजीपुढें खोटी बनावणी केली तर त्यात त्याचा काय दोष ? सशक्तांच्या माऱ्यापुढें आपला बचाव करून घ्यायला हा एकच मार्ग आहे. तेथें दुसरें साधन कोणते ?

परोपकाराकरिता असत्य ग्राह्य आहे. मनोरंजनाकरितां असत्य ग्राह्य आहे. थट्टेमध्ये असत्य ग्राह्य आहे. शिक्षणासाठीं असत्य ग्राह्य आहे. उदाहरणांसाठीं असत्य ग्राह्य आहे. प्रबळ शत्रूशी गाठ पडली असता असत्य ग्राह्य आहे युद्धशास्त्र आणि राजकारणशास्त्र ही असत्याचा सररहा उपयोग करितात. किम्बहुना सरकारचें डिटेक्टिव्ह खातें असत्याचा स्वीकार करूनच लबाड व पाताळयंत्री लोकांच्या कटाचा शोध लावीत असते.

ह्याशिवाय जिथें मनुष्याला अन्नपाण्याशिवाय मरायची पाळी येते अशा ठिकाणींही कित्येक लोक असत्य ग्राह्य समजतात ! दुष्काळ पडला, अन्नाचें नाव नाहींसे झालें, आणि बाजार उठून गेले, अशा वेळी एखादा मनुष्य जर दुसऱ्याचे घरांत शिरला व तिथल्या खाण्याच्या जिनसा उचलूं लागला तर ह्या लोकांच्या मतानें

तो मनुष्य निर्दोष आहे. दामाजीनें जेव्हां दुष्काळानें गांजलेल्या लोकांच्या बचावासाठी सरकारी कोठारें खुलीं केलीं तेव्हां विठोबानें ह्याच विचारानें त्याचा बचाव केला. बादशहानें त्याच्या मुसक्या बान्धलेल्या होत्या ! पण परमेश्वर ह्मणाला, नाहीं! हा मनुष्य दोषी नाहीं! लोकांना मरायची पाळी आली ह्मणूनच त्यानें हा गुन्हा केला ! अशा वेळीं केलेला गुन्हा हा गुन्हा नव्हे !

गा ! ह्या गुन्ह्याचे पोवाडे गा ! करा ! ह्या चोरीचे कौतुक करा ! हरिश्चन्द्राच्या सत्याचे जितके गुण गाइले तितकेच ह्या चोरीचेही गुण गा!

---

**प्रकरण १४ वें.**

( १ ) दुर्बळ आणि प्रबळ ह्यांचा सम्बन्ध आला असता दुर्बळांनीं स्वसरक्षणासाठीं आचरलेलें असत्य निन्देस पात्र नाहीं. शिवाजीनें अफजुलखानाबरोबर केलेलें कपट हें ह्याचें उदाहण होय. सासू व सून, पंतोजी व विद्यार्थी हीं ह्यांचीं आणखी उदाहरणें आहेत.

( २ ) जगांतील सर्व किल्ल्यांत असत्यासारखा बळकट किल्ला दुसरा नाहीं.

( ३ ) शत्रूला दाखविलेल्या हुलकावण्या, युद्धांतील गनीमी कावा, सरकारचें डिटेक्टिव्ह खातें वगैरे सर्व लबाडीचेच प्रकार आहेत पण त्यांत प्रबळांशीं झुज हा प्रकार असल्यामुळें हीं असत्यें क्षम्य आहेत.

( ४ ) अन्नपाण्याशिवाय मरण्याचा प्रसंग आला असतां त्या वेळीं आचरलेलें असत्य क्षम्य आहे. दामाजीनें लुटविलेले सरकारी खजीने हे ह्याचें उदाहरण होय.

# प्रकरण १५ वें.

## गुलामगिरीच्या वणव्यांत

:०:

मग दूषणीय असत्य तरी कोणतें ? जें स्वतःच्या पोटाची किंवा लोभी विकारांची तृप्ति करण्याकरितां आचरलें जातें तें ! दुसऱ्याचे पैसे आपले खिशांत यावे, दुसऱ्याच्या जमिनी आपल्याला मिळाव्या, दुसऱ्याचे दागिने आपल्या घरांत यावे, दुसऱ्याचीं घरें आपल्याला मिळावीं, आपली अधिकार—लालसा तृप्त व्हावी, आपली कामशान्ति व्हावी, आपले खासगी द्वेष उगवले जावे, आपल्या प्रेमांतल्या माणसांना बढती मिळावी व आपली बडेजाव व्हावी—ह्या हेतूनें केलेलें असत्य हें सर्व निन्द्य असत्य ! हें असत्य त्याज्य ! त्याचा निषेध व तिरस्कार सर्वकाल केला पाहिजे. त्याच्या वाऱ्यासही कोणीं उभें राहूं नये.

पण हें असत्य त्याज्य असलें तरी ह्या जगात जितकें असत्य तितकें सर्व त्याज्य हा सिद्धान्त मात्र चुकीचा आहे. सर्व असत्य त्याज्य नाहीं. कांहीं कांहीं असत्य ग्रहणीयच आहे. सर्व असत्य त्याज्य असतें तर सरकारला डिटे-क्टिव्ह खातें बन्द करावें लागलें असतें, युद्धशास्त्र फाडून टाकावें लागलें असतें, मुत्सद्यांना फांशीं द्यावें लागलें असतें, अंकगणितें जाळून टाकावीं लागलीं असतीं आणि नाटककारांना व नटांना

सुळावर चढवावें लागलें असते. पण ह्यांपैकीं जर कोणताच प्रकार होत नाहीं—आणि होणें शक्यहीं नाहीं—तर उगीच असत्याची निन्दा करण्यांत काय अर्थ आहे ? निदान असत्याचा राग करण्याचे ऐवजीं त्याची कींव करायला नको काय ? आपल्या झोंपेंत व्यत्यय येऊं नये म्हणून मुलाला—"मी घरांत नाही अं!" असें सांगायला सांगणारा बाप दोषी आहे असें वाटेल तर म्हणा, पण बाहेर पैसा उकळणारा पठाण येणार असें माहीत असल्यामुळें भीतीनें आपण घरात नसल्याचें सांगणारा बाप—ह्यालाही तुम्ही दोषी कसे म्हणणार ? त्याची कींव करा, त्याचीं दुःखें त्याला विचारा व त्याच्या भीतीतून त्याला सोडवायचा प्रयत्न करा. पण असा प्रयत्न न करताना जर केवळ त्याच्या असत्याबद्दलच त्याला हंसाल तर तुह्मी त्या पठाणालाच मदत केल्यासारखें होइल. जोर, जुलूम व जबरदस्ती ह्यांना मदत करणें हेंही असत्याला मदत करण्यासारखें आहे हे तुह्मांला लक्ष्यात ठेवलें पाहिजे.

कांहीं कांहीं असत्य हे तर जरूरीचे व प्रशंसास्पदच आहे. परोपकाराकरितां केलेलें असत्य हें ह्या वर्गातले होय व ह्याचे विवेचन आह्मीं मागच्या एका प्रकरणांत केलेलेच आहे. त्यातही ज्या वेळीं जवळ कोणतींही साधनें नसतां परोपकाराची इच्छा होते त्या वेळीं असत्याचें अवलम्बन केल्याशिवाय गत्यन्तरच नसतें. सर्व परोपकारांत अतिशय मोठा परोपकार ह्मणजे आपल्या देशास पारतंत्र्यांतून मुक्त करणें हा होय ! आपला देश दुसऱ्याचे सत्तेखालीं

असावा ही गोष्ट कोणाही मानी पुरुषाचे मनास सहन होण्याजोगी नाही. तो त्यास उपमर्द वाटलाच पाहिजे व ह्या उपमर्दाचा डाग काढून टाकण्याचा प्रयत्न करण्याची इच्छा त्याला आलीच पाहिजे. तुम्ही आपल्या देशबान्धवांना कोणती देणगी द्यायची इच्छा कराल? कोणत्या देणगीने तुम्ही त्यांचीं मुखकमलें प्रफुल्लित कराल? कोणत्या देणगीने तुम्ही त्याचे ससारांत सणाचे दिवस आणाल, त्याचे आयुष्यात दिवाळी उत्पन्न कराल? कोणत्या देणगीने तुम्ही त्यांना कायमचे आनन्दित कराल? कोणत्या देणगीने तुम्ही त्याचा उद्वेग कायमचा घालवाल?

अर्थात् स्वातंत्र्याच्या! स्वातंत्र्यासारखी उन्नतिकारक वस्तु नाहीं. स्वातंत्र्यासारखा शोभिवन्त दागिना नाही. स्वातत्र्य हें जीविताचें सार्थक आहे, स्वातंत्र्य हे सुखाचे मूळ आहे. स्वातंत्र्य हे ध्येयांतलें ध्येय आहे, स्वातंत्र्य हे पवित्रातले पवित्र आहे. मनुष्यजन्म हा स्वातंत्र्याकरितां, सर्व शिक्षण हे स्वातंत्र्याकरितां, सर्व भागधेय हें स्वातंत्र्याकरितां! स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं मन तुटेल, मनोवृत्ति उठेल—स्वातंत्र्याने डोळ्यांचें पारणें फिटेल! स्वातंत्र्य नसेल तर डोळे तरी कशाला आणि देह तरी कशाला?

अशी ही जी अत्यन्त लाडकी वस्तु—ही जी अत्यन्त मनोहर ठेव—ही जी अत्यन्त मूल्यवान् चीज—चित्त आकर्षणारा हा जो हिरा—राष्ट्रांच्या राष्ट्र लोभविणारा जो हा तारा—तो लुप्त होणें म्हणजे राष्ट्रावर केवढे संकट! आणि हें संकट जो हरण करील त्याची केवढी योग्यता! हिमालयाचें माप करून गणति केली

तरी देखील ह्या पुरुषाच्या योग्यतेची मोजणी व्हायची नाहीं, मग वाङमयांतले मोजके शब्द व मेंन्दूतल्या मोजक्या कल्पना त्याची काय गणति करणार ?

आणि म्हणून शिवाजीसारख्यांचीं नांवें लोकांना अत्यन्त प्रिय होऊन बसलेलीं आहेत. रक्ताच्या प्रत्येक थेम्बांत तीं आहेत. श्वासातल्या प्रत्येक वाऱ्यांत तीं आहेत. स्वप्नांतल्या प्रत्येक दृश्यात तीं आहेत. निद्रेंतल्या प्रत्येक आनन्दांत तीं आहेत. पापणीच्या प्रत्येक हालण्यांत तीं आहेत. हृदयाच्या प्रत्येक उडण्यांत ती आहेत. शरीरांतल्या रसारसांत तीं आहेत—नाडीच्या नसानसांत ती आहेत तीं दिशादिशांना आहेत—तीं सर्व उपदिशांना आहेन. कोणतेंही मानवी अन्तकरण घ्या आणि तीं कुठें नाहींत तें सांगा.

आणि एवढेंच नव्हे तर राष्ट्र—स्वातंत्र्याच्या प्रयत्नात जे अपेशी झाले त्यांचींही नांवें लोकांना प्रिय आहत. ह्यांपैकीं कित्येक फांशीं गेले असतील, कित्येक हद्दपारीवर पाठविलेले असतील, कित्येकाचे पायांत बेड्या पडल्या असतील, कित्येकांची सम्पत्ति जप्त झाली असेल, कित्येकांनीं घाणे ओढले असतील—कित्येकांचे हालहाल झाले असतील, कित्येकांनीं आत्महत्याही केली असेल ! पण हे सर्व जीव—हे सर्व आत्मे-लोकांना प्रिय आहेत. ह्यांपैकीं कित्येकांचे नांवांना बन्दी असेल—कित्येकांचीं खोटीं चरित्रें लिहिलीं असतलि, कित्येकांची नीच लोकांत गणति केली असेल, कित्येकांवर नीच कृत्यें लादलीं असतील, तरी पण ह्या नांवावरील लोकांचें प्रेम

लुप्त झालेलें नाहीं! चारचौघांत त्यांचे नांवांना बन्दी असूं द्या—पण प्रत्येक अन्तःकरण त्यांचेसाठीं खुले आहे. त्यांचेसाठी पुतळे उभारलेले नसूं द्या, पण प्रत्येक मनाच्या मार्केटांत त्यांचा रत्नमय पुतळा उभारलेला आहे. त्यांची बदनामी प्रत्येक इतिहासांत केलेली असूं द्या—पण त्याचा खरा इतिहास मनाच्या ग्लेज कागदावर कृततज्ञेच्या सोनेरी ठशांनीं लिहिलेला आहे आणि त्यांत नाठ्या टैपांत हें लिहिलेलें आहे की

**देश स्वतंत्र करण्याच्या प्रयत्नांत हा आत्मा मृत्यु पावला !**

ह्याच्या पापपुण्यांचा तुह्मी काय विचार करणार ? देशाला स्वतंत्रता मिळविण्याचें अत्यन्त श्रेष्ठ पुण्य कृत्य ज्यानीं केलें ते कितीदा खोटे बोलले व कितीदा असत्यांत शिरले ह्याची तुम्ही कसली चौकशी करणार ! ते एकदाही सत्य बोलले नसतील, त्याची एकही मुदत खरी ठरली नसेल व त्यांचें एकही वचन तडीला गेलें नसेल—पण देशभक्तीचें त्यांनीं एवढें पुण्य केलेलें आहे कीं त्या कर्पूरज्वालेंत हीं सर्व असत्यें जळून भस्म होतील. सत्य, सत्य ह्मणजे काय ? देशभक्तीपेक्षां सत्य हें ज्यास्त आहे काय ? शेजारणीशीं खरें बोलून देशाची मान कापणाऱ्यांपेक्षां रोजच्या व्यवहारांतला प्रत्येक शब्द खोटा ठरला तरी हरकत नाहीं, पण देशाशीं इमान राखणाऱ्याची योग्यता किती तरी अधिक! गुलामगिरीमध्यें डांबून ठेवणारें सत्य——खुशाल असलें !धिक्कारडें सत्य झुगारलें जावो——पण जर असत्य हें देशाला स्वातंत्र्य मिळवून देत असलें तर तें असत्यच बरें ! मग

त्या असत्याचे पायीं रौरव नरकांत कायमचें रहावें लागलें तरी हरकत नाहीं. देशाच्या पारतंत्र्यापेक्षां रौरव नरक खात्रीनें वाईट नाही. गुलामागिरीच्या वणव्यावर रोज होरपळून जाण्यापेक्षा रौरव नरकांतले अग्नीचे प्रदेश खात्रीनें शीतल असतील.

---

**प्रकरण १५ वें**

( १ ) ज्यावेळीं असत्य हे स्वतःच्या पोटाची किंवा लोभी विकारांची तृप्ति करण्याकरिता आचरले जाते त्या वेळीं तें दूषणीय असते.

( २ ) राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं झटणारे वीर ह्यानीं कितीही असत्य आचरले तरी ते लोकास पूज्य होतात, कारण त्याच्या असत्यात स्वहित नसतें, केवळ परहितच असते.



# प्रकरण १६ वें.

## हरिश्चन्द्राचे वेळेपासून

हें जग सत्य—असत्यानें भरलेलें आहे. सत्याच्या पोटीं असत्य आहे. असत्याचे पोटी सत्य आहे. सत्य असत्याचे पायावर उभे आहे. असत्य सत्याचे पायावर उभें आहे सत्याला असत्याचा आधार आहे. असत्याला सत्याचा आधार आहे. सत्य असत्याचा हात धरून उभे असतें असत्य सत्याचा हात धरून उभे असतें.

परमेश्वरानें जग उत्पन्न केलें. परमेश्वर जगाचा पिता. जग हें परमेश्वराचें अपत्य. परन्तु परमेश्वर सत्य आहे. जग असत्य आहे. सत्य परमेश्वर असत्य जगाला जन्म देतो. असत्य जग सत्य परमेश्वरापासून उत्पन्न होते. असत्य जग असेल तर सत्य परमेश्वराची कीर्ति ! सत्य परमेश्वर असेल तर असत्य जगाचा जन्म ! सत्याला असत्यावाचून प्रतिष्ठा नाही. असत्याला सत्यावाचून प्राण नाहीं. सत्य—असत्याची ही जोडी कोण फोडूं शकेल ?

जगात आपणास सर्वत्र असत्य आढळत असतें ह्याचें कारण काय ? ह्याचें कारण सत्य—असत्याचें हें संमिश्रण. सत्यात असत्याचे धागे व असत्यात सत्याचे टांके असे बेमालून शिवले गेलेले आहेत कीं ते एकमेकांपासून निराळें करणें अशक्य आहे. परमेश्वर जळी-स्थळीं-काष्ठीं पाषाणीं भरलेला आहे असें जेव्हां आपण ह्मणतों त्या वेळीं त्याचा अर्थ काय ? आपणांस माहीत आहे कीं

जळ–स्थळ–काष्ठ–पाषाण हें सर्व असत्य आहे. सर्व सृष्टिच असत्य आहे. ह्या जगांत परमेश्वरच काय तो सत्य आहे. तेव्हां परमेश्वर जळीं-स्थळीं-काष्ठीं-पाषाणीं भरलेला असणें ह्याचा अर्थ असत्याच्या प्रत्येक कणांत सत्य भरलेलें आहे असाच होतो. सत्य हें बीज, असत्य हें कवच ! सत्य हे मोती, असत्य ही शिंप ! सत्य हें रत्न, असत्य हें कोन्दण ! सत्य हा प्राण, असत्य हें शरीर ! सत्य आणि असत्य ह्यांची जोडी कोण फोडील ?

सत्य—असत्याचें हें एकीकरण इतकें अस्सल आहे कीं सत्या शिवाय असत्याचें किंवा असत्याशिवाय सत्याचें चालायचें नाहीं. सत्य असेल तरच असत्य टिकेल व असत्य असेल तरच सत्य टिकेल. सत्याचें एक टोंक असत्याचें आहे व असत्याचें एक टोंक सत्याचें आहे. सत्याचें टोंक धरून ओढलें तर असत्य फरफटत येईल व असत्याचें टोंक धरून ओढलें तर सत्य खेंचलें जाईल. असत्याला ठोका दिला तर सत्य चेंचलें जाईल व सत्य चेंचायचा विचार केला तर असत्य प्राणाला मुकेल. सत्य आणि असत्य ह्यांची जोडी कोण फोडूं शकेल ?

महात्मा गान्धी ह्यांची सत्याबद्दल फार प्रसिद्धि आहे. ठीक आहे. महात्मा गान्धी ह्यांची अशी प्रसिद्धि असणें फार चांगलें ! हरिश्चन्द्राचे वेळेपासून अशी प्रसिद्धि कुणाची नव्हती. मध्यन्तरीं फक्त रामशास्त्री होऊन गेले. पण रामशास्त्री कांहीं "ऑल इण्डिया" मनुष्य नव्हते. महात्मा गान्धी तसे आहेत. किम्बहुना महात्मा गान्धी हे "ऑल वर्ल्ड" मनुष्य आहेत.

## प्रकरण १६ वें.

आज जगाचा एकही भाग असा नाही की जिथें महात्मा गान्धी माहीत नाहींत. महाराष्ट्र सोडून दिला तर हिंदुस्थानातील प्रत्येक प्रान्तात ते तिथलेच आहेत असें वाटतात. गुजराथ हा त्याचाच प्रान्त आहे मद्राशी लोक त्यानी आपले करून सोडलेले आहेत. सिन्ध प्रान्ताला ते आपलेसे वाटतात. पंजाबाला वाटतें कीं गान्धीजी आपले! बंगालमध्ये सी. आर दासचें घर ह्मणजे त्यांचे घर आहे आणि अलाहाबाद प्रान्तात पण्डित मोतीलालपेक्षां ते लोकाना ज्यास्त प्रिय आहेत! बहारमध्ये त्यानीं आपला पहिला सत्याग्रह सुरू केला व ब्रह्मदेश त्याना बुद्धाइतका मान देतो. चीनजपानकडे त्याची महती फारशी नाही. परन्तु मुसलमानी मुलखात त्यानी फार प्रसिद्धि आहे काबूलपासून कॉन्स्टॅण्टिनोपलपर्यन्त प्रत्येक मुसलमान त्याना ओळखतो आणि अफगाणिस्थानपासून बोलशेव्हिक रशियापर्यन्त त्यांचे चहाते पसरलेले आहेत. युरोपमध्ये जर्मनीने त्याचा सत्याग्रह उचलला होता व फ्रान्समधील विद्वान् लोक त्याना मोठे समजतात अमेरिकेत त्याना येशू ख्रिस्ताचे अवतार मानणारे लोक आहेत आणि सर्व जगभर त्यांचे सत्य दुमदुमून राहिलेलें आहे. इतकी मान्य व्यक्ति दुसरीकडे कुठे सापडणार व इतकी लोकप्रियता हरिश्चन्द्राला तरी कोठून असणार?

हरिश्चन्द्राने मागून सत्यतेबद्दल महात्मा गान्धींच प्रसिद्धीला आले. सत्यतेबद्दल इतकी प्रसिद्धि दुसऱ्या कुणाचीही नव्हती. दुसरे अनेक चागले लोक ह्या जगांत होऊन गेले. अकबर झाले, कबीर

झाले, नानक झाले, मिराबाई झाली, तुळसीदास झाले, चैतन्य झाले, शिवाजी महाराज झाले, रामदास झाले, तुकाराम झाले, विवेकानन्द झाले, रानडे झाले, तेलंग झाले, पण सत्यतेचे बाबदींत महात्मा गान्धीचीच वरचढ! हरिश्चन्द्राचे वेळेपासून सत्याबद्दलची इतकी ख्याति दुसऱ्या कुणाचीही नव्हती.

पण असत्यानें त्याना काय थोडी पीडा दिली ? नाही, गान्धीं-च्याही सत्याच्या राज्यात असत्य डोकावलेंच ! त्याच्या सत्या-च्याही मळ्यांत असत्याचें पीक आले ! मृत्यूनें ज्याप्रमाणे ध्रुवालाही सोडले नाही, त्याप्रमाणे असत्यानें महात्मा गान्धीचीही पाठ सोडली नाही

गान्धी ह्मणाले कीं अमुक महिन्याच्या अमुक तारखेस मी हिन्दु-स्थानात स्वराज्य आणीन ! गान्धी ह्मणाले की बारडोली येथे अमुक दिवशीं मी कायदेभगाला सुरवात करीन. गान्धी ह्मणाले की मी हिन्दु—मुसलमानाचे तण्टे तोडीन, नाहीतर उपाशी राहीन ! पण माहात्मा गान्धीचे ह्यांपैकी कोणतेही संकल्प सिद्धीला गेले नाहीत. हिन्दु-स्थानांत स्वराज्य आलें नाहीं, बारडोलीस कायदेभंग सुरू झाला नाहीं, हिन्दुस्थानांतील हिन्दु—मुसलमानाचे तण्टे बन्द पडले नाहींत.

आमचे प्रिय वाचक आह्मांस विचारतील कीं ह्यांत महात्मा गान्धींचा काय दोष ? गान्धींनी आपणाकडून शक्य तितका प्रयत्न केला, ते कांहीं कोणाशी खोटें बोलले नाहीत. मग त्याना यश आलें नाही ह्यांत त्यांचा काय अपराध ?

पण आम्हीही हा त्याचा अपराध आहे असें ह्मणत नाही. आम्ही एवढेंच म्हणतों कीं त्यांचे संकल्प खोटे ठरले. त्यांचे बोलण्यास बाध आला. त्यांनी जें जे योजलें ते सर्व फुकट गेले.

पण ज्यांचे संकल्प फुकट जातात ते सत्यवादी लोक व लोकांना फसविण्यासाठी जे खोटे संकल्प जाहीर करतात ते असत्यवादी लोक ह्यांच्यात काय अन्तर आहे? काही नाही. दोघामुळें लोक सारखेच फसले जातात. एकाचे बाबदींत लोकाची जितकी फसवणूक होते तितकीच दुसऱ्याचेही बाबदींत होते

एक लबाड मनुष्य दुसऱ्याला म्हणाला कीं "तुला उद्या पैसे देईन." दुसरा मनुष्य त्याप्रमाणें "उद्या" आला. परन्तु पैसे देण्याचें त्याच्या मनात नव्हते. त्यानें त्याला पैसे दिले नाहीत व त्यास हात हालवीत तसेंच परत पाठविले

चारुदत्त फार उदार होता तो लोकांना फसविणारा नव्हता तो एका मनुष्यास ह्मणाला कीं "मी तुला उद्या पैसे देईन" तो मनुष्य त्याप्रमाणे "उद्या" आला. परन्तु चारुदत्ताजवळ द्यायला पैसे नव्हते. तो पैसे देऊं शकला नाहीं व त्यास त्याने तसेंच हात हालवीत परत पाठविलें.

आता ज्याला पैसे मिळायचे होते त्याचे बाबतींत लबाड मनुष्य व चारुदत्त ह्यांच्यात काय अन्तर पडलें? दोघांनींही त्यास हेलपाटा दिला, दोघांचेही वायदे खोटे ठरले, दोघांच्याही बाबदींत तो गरीब मनुष्य सपशेल फसला!

इंग्रज सरकार खरें बोलण्याबद्दल फार प्रसिद्ध आहे. खरें बोलण्या-बद्दल कोणत्याही सरकारची इतकी प्रसिद्धि नाही. इंग्रज सरकारची नीति फार उच्च दर्जाची आहे. किम्बहुना इंग्रज सरकारचा अवतार मुख्यतः नीतीच्या संरक्षणासाठींच आहे. इंग्रज सरकारास एका गोष्टीचा फार राग आला आणि ती गोष्ट ही की जर्मनीच्या कैझरने तहाच्या करारपत्राना " कागदाचे चिठोरें " ह्मटलें.

खरोखर काय लबाडी ही ! केवढी ठकबाजी ! ह्या लुच्चेगिरीला जगात उपमाच नाही ! जगातील कोणतीही सोनेरी टोळी इतकी लुच्चेगिरी करू शकणार नाहीं ! इंग्रज सरकारास ह्या लुच्चेगिरीचा जो राग आला तो यथार्थ आला ! सहीसाक्षीनिशीं व शिक्केमोर्तबाच्या गम्भीर विधीनें दिलेलीं वचनें मोडण्यास एखाद्या राजानें तयार व्हावें व त्यास केवळ " कागदाचें चिठोरें " ह्मणावें यासारखा नीचपणा दुसरा कोणता ?

परन्तु दुर्दैवाची गोष्ट अशीं की वचनभंगाबद्दल कैझरचा तिरस्कार करणारें व दिलेल्या वचनास अत्यन्त पवित्र मानणारें जें इंग्रज सरकार त्यानाही आपलीं वचनें पुरी करणे शक्य झालें नाही. खरोखर ह्याबद्दल इंग्रज सरकारास रोज दुःख होत असेल. आपली वचनें आपले हातून पाळली गेली नाहींत ह्याबद्दल त्याना रोज शरम वाटत असेल. वचनभंग करायला त्याना सबळ कारणेंही असतील. परन्तु एवढी गोष्ट खरी आहे की कैझरकडून जितका वचनभंग झाला तितकाच इंग्रज सरकाराकडून झाला. कैझरकडून

ज्याप्रमाणें आपलीं वचनें लाथाडलीं गेलीं त्याप्रमाणेंच इंग्रज सरकाराडूनही लाथाडलीं गेली. कैझरकडून ज्याप्रमाणें तहाच्या करारपत्राचें " कागदाचे चिठोरें " झालें, त्याप्रमाणें इंग्रज सरकाराकडूनही " राणीचा जाहीरनामा " वगैरे वचनाचे "कागदाचें चिठोरें " झालें

आता ह्याला अनेक सबळ कारणें असतील ! इंग्रज सरकारनें जीं वचनें मोडलीं तीं दुष्टपणामुळें अथवा लबाडीमुळें मोडलीं नसतील. त्याचा अगदी निरुपाय झाला असेल—वसाहतवाल्याचेपुढें त्याचा अगदी इलाज थकला असेल—व ह्यात भर घालणारीं इतरही अनेक कारणें घडलीं असतील व ह्मणूनच त्यानीं " राणीचा जाहीरनामा " पायाखाली तुडविला असेल ! इंग्रज सरकारवरील ह्या आपत्तीबद्दल आह्मास त्याची सहानुभूति वाटते वचनभंगाचा असला दुर्धर प्रसंग कोणावर कधीही न येवो अशीही आमची इच्छा आहे. परन्तु एवढी गोष्ट खरी की इंग्रज सरकारकडूनही कैझरप्रमाणेंच वचनभंग घडला कैझरने आपल्या वचनास ज्याप्रमाणें " कागदाचें चिठोरें " मानलें, त्याप्रमाणेंच इंग्रज सरकारकडूनही दिलेल्या वचनांचे " कागदाचे चिठोरें " झालें. फरक एवढाच कीं कैझरनें जें वचन मोडले तें दुष्टपणामुळें, लबाडीमुळें व ठकबाजीमुळें मोडलें आणि इंग्रज सरकारनें केवळ सत्यपणामुळें, केवळ सचोटीमुळें, केवळ प्रामाणिकपणामुळें आपले वचन मोडलें.

पण अखेर परिमाण एकच ! ठकबाजीमुळें वचनभंग झाला, तरीही तो वचनभंगच व प्रामाणिकपणामुळें वचनभंग झाला तरीही

तो वचनभंगच ! दोन्हीमुळें लोक सारखेच फसतात, व दोन्हीमुळें त्यांचें सारखेंच नुकसान होतें. इंग्रज सरकारची सचोटी व कैसरची लबाडी ह्यांचा लोकांना सारखाच परिणाम भोगावा लागतो. त्रिम्बकजी डेंगळ्यांची कुटिलता व महात्मा गान्धीची सत्यता ह्यांचेमुळें सारखेंच नुकसान होत असते.

ह्या जगांत सत्यात असत्य मिसळलेलें आहे व असत्यात सत्य मिसळलेलें आहे. त्याची निवड कोणास करता येईल ?

---

**प्रकरण १६ वें.**

( १ ) हे जग सत्य—असत्याने भरलेले आहे. सत्याचे पोटीं असत्य आहे व असत्याचे पोटीं सत्य आहे.

( २ ) परमेश्वर सत्य आहे व जग हे असत्य आहे. पण परमेश्वरच जग उत्पन्न करतो व त्यात व्यापून राहतो. ह्यावरून सत्यच असत्यास जन्म देते व असत्यात राहते असे दिसून येतें.

( ३ ) ह्या जगात सत्याशिवाय असत्याचे चालायचें नाहीं व असत्याशिवाय सत्याचें चालायचें नाहीं. सत्याला असत्याचा आधार आहे व असत्याला सत्याचा आधार आहे.

( ४ ) ज्यांची सत्याबद्दल फार प्रसिद्धि असते त्यांच्यातही असत्य येतेंच, त्यांच्या सत्यांत असत्य डोकवल्यावाचून राहत नाहीं.

( ५ ) महात्मा गान्धींची सत्याबद्दल एवढी प्रसिद्धि असतांही यांच्या प्रतिज्ञा असत्य ठरल्या.

( ६ ) तह्मांना " कागदाचें चिठोरें " ह्मटल्याबद्दल कैझरला हसणाऱ्या इंग्रज सरकारचे हातूनही आपल्या अभिवचनाचें " कागदाचें चिठोरें " च झालें.

( ७ ) प्रामाणिक मनुष्याची वचनें खोटीं ठरून लोक फसले जाणें व लबाड मनुष्याची वचनें खोटीं ठरून लोक फसले जाणें हे परिणामाचे दृष्टीनें सारखेच !



# प्रकरण १७ वें.

## गान्धींच्या " हिमालयन मिस्टेक्स् " !

सर्व जगांत अतिशय वरताद असे काय आहे ! जगात सर्वाच्यावर मात करणारें कोण ? सर्व मीं मी ह्मणणाऱ्याचा पराभव कोण करीत असतें ? असत्य ! ते नाही तेथें प्रवेश करिते—नाही त्याचा अभिमान उतरते—नाही त्याचेवर कुरघोडी करतें

सत्याचा अत्यन्त अभिमान धरणारें कोण ? तर इंग्रज सरकार ! पण त्याचा शब्दन् शब्द तें खोटे केल्यावाचून रहात नाही. आपल्या तहाना " कागदाचें चिटोरें " मानणाऱ्या कैझरइतकीच इंग्रज सरकारने दिलेली वचनें ते त्यांच्या हातून धुळीला मिळविते

सत्याबद्दल अत्यन्त कीर्ति कोणाची ? माहात्मा गान्धींची ! पण असत्य हे इतकें हुषार आहे की महात्मा गान्धींच्याही वचनात तें जाऊन बसतें. असत्याने माहात्मा गान्धींच्या शब्दाची इतकी पोखरणी केलेली आहे कीं त्याची एकही प्रतिज्ञा खरी झाली नाहीं, एकही संकल्प खरा ठरला नाहीं, एकही उद्देश तडीस गेला नाही.

सत्याचा जों जों ज्यास्त पुकारा करावा तों तों असत्य ज्यास्तच पाठीस लागतें. जों जों त्याची ज्यास्त टिमकी वाजवावी तों तों तें ज्यास्त येऊन बिलगतें. जों जों त्याचेबद्दल ज्यास्त आढ्यता बाळगावी तों तों असत्याला ईर्ष्या चढल्यावाचून रहात नाहीं. अस-

त्याची खोड मोडण्याचा रामबाण उपाय ह्मणजे आपण सत्यवचनी असल्याचा फार डागोरा न पिटणें हाच होय. असला डागोरा आपण जोपर्यन्त पिटलेला नाही तोंपर्यन्त आपले हातून फारसें असत्य घडत नाहीं. पण असा डागोरा पिटला की असत्यालाही चेव येतो व ते अपले शब्द खोटे पाडते!

"अभिमानाचे घर खालीं" अशी जी ह्मण आहे ती काही खोटी नाही. अभिमानाचे नशीबी पराभव लिहिलेला आहे तुह्मी विद्वत्तेची घमेण्ड बाळगाल तर कुणीतरी येऊन तुमचेवर जयपत्र मिळवील. तुह्मी शौर्याची घमेण्ड बाळगाल तर कुणीतरी तुह्माला जमिनीवर लोळवील आणि तुह्मी सत्याबद्दल घमेण्ड बाळगाल तर तुमचा प्रत्येक शब्द खोटा ठरेल

खरोखर सत्याची घमेण्ड बाळगण्यात काय अर्थ आहे? सत्यावर प्रेम करणें, सत्य आचरणे, सत्य न ढळूं देण्याचा निश्चय करणे ही गोष्ट चागली—त्याच्यायोगानें सत्य सम्भाळलेंही जातें, पण सत्याची घमेण्ड बाळगणे ह्यासारखीमात्र चूक नाही.

सत्याची घमेण्ड बाळगली कीं असत्य पिसाळते व तुमची फजिती करण्याचा ते चंग बान्धते. सत्याची घमेण्ड बाळगणाऱ्याचा शब्द ह्या जगात जितका खाली पडतो तितका इतरांचा पडत नाही.

सत्यवचनी गान्धी ह्याचा शब्द इतक्या वेळा का खाली पडला? कारण त्यानी सत्याचा फार गाजावाजा केला. ते सत्याचा इतका गाजावजा न करते व निमूटपणें आणि नम्रपणे सत्याचें आचरण

करीत राहते तर त्याचा शब्द इतके वेळा खचीत खोटा ठरला नसता.

जे आपल्याला करायचे असेल त्याच्या कधींही जाहिराती लावूं नयेत. जाहिराती लावल्यावांचून एखादा सद्‌गुण जो मनुष्य आचरतो त्याचाच सद्‌गुण खरा ठरतो जो जाहिराती लावतो तो मुळांतनरी खोटा असतो किंवा परिस्थितीमुळें तरी खोटा ठरतो. निसर्गाला विनय प्रिय आहे. त्यास घमेण्ड सहन होत नाहीं. मग ती घमेण्ड सत्याबद्दल कां असेना ?

जें बिघडते तें जाहिरातींमुळें बिघडतें. महात्मा गान्धींचें जें बिघडले ते जाहिरातीमुळेच बिघडलें. त्यांनी फार जाहिराती लावल्या. " मी सत्य ', " मीसत्य" असा त्यांनी फार नगारा वाजविला ते अशा जाहिराती न लावते तर त्याचे वचन ज्यास्त सत्य झालें असतें. 'सत्य संकल्पाचा दाता नारायण ' त्याचीं वचनें इतकी खोटीं न पाडता ! आतां महात्मा गान्धींचीं वचनें जी खोटीं ठरली ती लबाडीमुळें खोटी ठरली नाहति हें आह्मी मागेंच सांगितलें आहे. त्याचे अन्दाज चुकले ह्मणून त्यांचीं वचनें खोटी ठरली. पण अन्दाज चुकले काय आणि लोकांना मुद्दाम ठकविलें काय—परिणाम एकच ! लोक जे फसायचे ते फसतातच व त्यांचे जें नुकसान व्हायचें तें होऊन जातें.

जगाच्या लक्ष्यांत अजून जी गोष्ट आलेली नाहीं ती ही की अन्दाज चुकणें हें खोटें बोलण्याइतकेंच वाईट आहे. अन्दाज चुकणें हा गुन्हा आहे. अन्दाज चुकणें हा अत्यन्त मोठा अपराध आहे.

खरें सत्य पाळावयाचे ह्मणजे नुसती वचनें सत्य करायचीच मनाची तयारी असून उपयोगी नाही. तर आपले अन्दाज खरे ठरतील इतकी आपली अनुमाने बिनचूक असली पाहिजेत. अन्दाज चुकल्यामुळं जगात इतकी मानहानि होते कीं तितकी मानहानि असत्यामुळेसुद्धा होत नाहीं

लोकाना आजपर्यन्त एकच विद्या शिकाविलेली आहे ती विद्या ही कीं दुसऱ्याना दिलेली वचनें तुह्मी खरी करीत जा परन्तु खरी न होण्याजोगी वचने देत जाऊ नका असे त्याना शिकविण्यात आलेले नाहीं ते त्यास शिकविलें पाहिजे खरी न होण्याजोगी वचने कधीही न देण्याबद्दल त्यांना बजाविलें पाहिजे.

पुढाऱ्याना तर हे शिक्षण मुद्दाम दिले पाहिजे खरा पुढारी तो कीं जो दिलेली वचनें खरी करायला झटतो, एवढेच नव्हे तर खरीं करता येण्याजोगींच वचने जो देत असतो. वचने मोडणें हा जेवढ गुन्हा आहे तेवढाच न पाळता येण्याजोगीं वचने देणे हाही गुन्हा आहे पण तो गुन्हा आहे हे लक्ष्यांत घेतले पाहिजे व हा गुन्हा करणाऱ्याची स्पष्ट कानउघाडणी केली पाहिजे.

पुढाऱ्यांचा पुढारीपणा पारखण्याची दोन तऱ्हेची कसोटी आहे. एक ही कीं आपलीं वचनें खरीं करण्याची त्यांची इच्छा आहे कीं नाहीं? आणि दुसरी ही कीं दिलेलीं वचनें खरी करण्याची धमक त्यांचे अंगांत आहे कीं नाहीं ? ह्या दोन्ही कसोट्यांत पुढारी पूर्ण-

पणे उतरला पाहिजे. ह्या दोन्ही कसोट्यात जो पुढारी उतरेल तोच धन्य ! त्यानेंच लोकाचा पाग फेडला ! जो एकाच कसोटीत उतरेल तो वन्द्य असेल, प्रेम करण्याजोगा असेल किंवा कीव करण्याजोगा असेल, पण तो खरा पुढारी खास नव्हे.

इंग्रज सरकारने हिन्दुस्थानास राणीचा जाहिरनामा दिला— अहाहा ! इंग्रज सरकारचे हे केवढे तरी उपकार ! ह्यावरून त्याचे प्रेमळ अन्त.करण कितीतरी दिसते ! हिन्दुस्थानाविषयी त्याची किती तरी कळकळ दिसून येते ! पण हा जाहिरनामा खरा करून दाखविण्याची शक्यता नसल्यामुळे ही सर्व कळकळ व्यर्थ गेली ! प्रेमाच्या कसोटीत इंग्रज सरकार उतरले पण शक्यतेच्या कसो- टीत इंग्रज सरकार उतरले नाही खरोखर इंग्रज सरकारची ह्या- बद्दल किती तरी कीव केली पाहिजे !

माहात्मा गान्धीचीही कीवच केली पाहिजे. हिन्दुस्थानला स्वराज्य मिळवून द्यावें ही त्याना इच्छा आहे. कायदेभगाची मोहीम सुरू करावी ही त्याना इच्छा आहे हिन्दुमुसलमानाचे तण्टे नाहींसे करावे ही त्यांना इच्छा आहे पण दुर्दैव की ह्यापैकी कोण- तीही ताकत त्याचे अंगांत नाही. त्याच्या इच्छा पवित्र आहेत, पण त्या पवित्र इच्छा खऱ्या करून दाखविण्याची धमक त्यांचे जवळ नाही.

ज्याचे जवळ ही धमक असेल तोच हिन्दुस्थानचा पुढारी ! ज्याचे- जवळ ही धमक असेल तोच हिंदुस्थानचे नशीब उदयाला आणील !

ज्याचेजवळ ही धमक असेल तोच हिंदुस्थानचे स्वातंत्र्य हिंदुस्थानाकडे खेचून आणील. इतर लोकांनीं सत्याचा मोठा आव आणला तरी त्याचा काय उपयोग ?

शिवाजीने अफजुलखानाचा खून कपटानें केला असें ह्मणतात. शिवाजीच्या ह्या असत्याबद्दल त्याला दोषही देण्यात येतो. पण त्याने असत्य केलेले असले तरी स्वातंत्र्य मिळविले त्याचे हातून सत्याचा खून झालेला असला तरी राष्ट्र-स्वातंत्र्याचा खून त्याचे हातून झाला नाही.

महात्मा गान्धींचा प्रयत्न सत्य सम्भाळण्याचा होता. त्याचे हातून हे सत्य कसे सम्भाळले गेले नाही हें आह्मी वर दाखविलेच आहे. परन्तु त्यात त्याचा कोणताही दोष नव्हता तो त्याच्या "हिमालयन् मिस्टेकस"चा दोष होता

परन्तु अशीही कल्पना केली की महात्मा गान्धी ह्यानीं सत्य सम्भाळले-तरीही त्याना राष्ट्रस्वातंत्र्य सम्भाळता आले नाहीं. त्यानीं सत्याचा बचाव केला, पण राष्ट्र—स्वातंत्र्याचा होणारा खून त्याना वाचविता आला नाही त्याचे देखत-त्यास न जुमानता— त्याच्या सत्याचीही पर्वा न करता राष्ट्र—स्वातंत्र्याचा धडधडीत खून होत गेला

म्हणजे सत्य सम्भाळायला गेले तर स्वातंत्र्य सम्भाळणे जड जाते व स्वातंत्र्य सम्भाळायला गेले तर सत्य सम्भाळणें कठीण पडते. सत्याचा पदोपदी खून करावा त्याच वेळी राष्ट्र—स्वातंत्र्य मिळविता येते–ज्या वेळी राष्ट्र स्वातंत्र्य बळी द्यायला तयार व्हावें त्याच वेळी महात्मा गान्धीप्रमाणे सत्याबद्दलची कीर्ति सम्भाळतां

येतें. सत्य आणि राष्ट्र-स्वातंत्र्य ह्यांचा ह्याप्रमाणे विरोध दिसतो त्या दोहोंची गाठ कोणी तरी घालूं शकेल काय ? सत्य सम्भाळून कोणी राष्ट्र–स्वातंत्र्य मिळवूं शकेल काय ?

शिवाजीला हे साधले नाही. आल्फ्रेड राजाला हें साधले नाही. हे कोणासही साधले नाहीं. एवढा सत्यमूर्ति श्रीकृष्ण–पण त्याला सुद्धा हे साधलें नाही. श्रीकृष्णाची जर कशाबद्दल प्रसिद्धि असेल तर ती कपटी कारस्थानाबद्दल होय !

मग राष्ट्र–स्वातंत्र्यासाठी सत्य बाजूस सारावे काय ? इंग्लण्ड च्या आल्फ्रेड राजाचे चारित्र सागते की सारावे—सत्य बाजूला सारावे—वाटेल ते ढोंग करावे –वाटेल ते सोंग घ्यावे पण राष्ट्र स्वतंत्र करावे. सत्याचा वाटेल तसा खून होऊं द्यावा– पण राष्ट्र स्वतंत्र करावेंच करावे

बरे, राष्ट्र –स्वातंत्र्य एके बाजूस सारून नुसतें सत्य सम्भाळावे काय ? महात्मा गान्धींचें चारित्र सागते कीं सत्य हे सम्भाळलेच पाहिजे. राष्ट्र–स्वातंत्र्याला डाग लागला तरी सत्याला डाग लागता उपयोगी नाही.

पण सत्य सम्भाळण्याचा हा खटाटोप शक्य आहे काय ? नाही. हा खटाटोप शक्य नाहीं. अशा कृत्रिम रीतीनें सत्य सम्भाळायला गेले की राष्ट्रस्वातंत्र्यहीं जाते आणि सत्यहीं नाश पावते. कारण सत्यांत असत्य मिसळलें गेलें आहे आणि असत्यांत सत्य मिसळलें गेलें आहे. कृत्रिम रीतीने सत्य सम्भाळायला जाल तर ते हुषार असत्य त्यांत इतक्या कुशलतेने डोकावील कीं सर्व सत्य असत्यमय बनून जाईल.

कित्येक लोक राजकारणात पडतांना फार चिकित्सा करतात! कोणती गोष्ट किती मर्यादेपर्यन्त करावी, ती किती केली असता योग्य, किती केली असता अयोग्य, कोणतें पाऊल किती टाकावे, ते किती वाजवावे, कोणत्या बेतात ठेवावें—तात्पर्य काय की संकल्पामध्येच मारा पुण्यकाळ! कृतीला कधी आरम्भच व्हायला नको असला काक्षेखोरपणा काय कामाचा? हा दुबळेपणाचा कडेलोटच आहे देशाच्या स्वातन्त्र्यासाठीं झटायचे, त्यात थाम्बणार किती व चमकणार किती? कोणत्या गोष्टी तुम्हाला नडत आहेत? तुम्ही कुठे अडखळत आहात? तुम्ही जर दर वेळा पुस्तके उघडून पाहायला लागला तर राष्ट्राच्या स्वातंत्र्याकडे तुमचा मुळीच प्रवास व्हायचा नाहीं देवाचें नाव घ्या आणि चालायला लागा! दासबोध मग! गान्धींचे लेख मग! त्याची आत्ता काहीएक काळजी नको. अहो! दासबोधाची "एडिशन" पुन्हा निघेल, गान्धी आपलें नवजीवन पुन्हा छापतील, मनुस्मृतीच्या नव्या टीका लिहिल्या जातील—पण परकीय अमलाखालीं कमजोर होणाऱ्या देशाचा प्राणतंतु पुन्हा सावरला जाणार नाहीं तुमचें काहीं चुकले माकले, विसरले किंवा घसरलें—तर त्याची काहीं काळजी करूं नका. देशप्रीति हे एवढें पुण्य कर्म आहे की त्यात सर्व सांवरलें जाईल. राष्ट्रभक्तीची दुथडी गंगा इमानदारीच्या अमृतवृष्टीखालीं अथांग भरून चाललेली असतांना तिथें कोणता प्रमाद दुरुस्त किंवा कोणतें अपकृत्य शुभ्र व्हायचें राहील? ह्या प्रचण्ड डोहात—ह्या विस्तीर्ण लाटांत—ह्या जगड्व्याळ गंगौघांत जें धुतलें जाणार नाही, जें पवित्र बनणार

नाहीं, असें काय आहे ? अहो, राष्ट्रभक्तीच्या ह्या गंगाथडींत मूर्तिमन्त पापाला देखील पुण्याचा जरीकाठी पिताम्बर चढेल—मग तुमच्या क्षुद्र चुकाचा तिथे काय पाड ! चला पुढें व्हा—स्वातन्त्र्य-कार्याला लागा—तुम्हाला जे सुचेल ते करा—लक्ष्यात ठेवा, तुम्ही जें जे कराल तीच मनुस्मृति, तोच दासबोध, तीच तीच भगवद्गीता !

---

**प्रकरण १७ वें**

( १ ) ह्या जगात असत्य हे सर्वात वस्ताद आहे ते नाहीं तेथे प्रवेश करते व नाहीं त्याचा अभिमान उतरते.

( २ ) सत्याची घमेण्ड बाळगीता गेले कीं त्यात असत्य तेवढे येऊन उलरते सत्याची टिमकी वाजविणाऱ्याच्या सर्व प्रतिज्ञा असत्य होतात.

( ३ ) महात्मा गांधीच्या प्रतिज्ञा ह्यामुळेच असत्य ठरल्या त्यानीं सत्याच्या विनाकारण फार जाहिराती लावल्या.

( ४ ) जाहिराती लावल्यावाचून जो मनुष्य प्रत्यक्ष सद्गुण आचरतो त्याचाच सद्गुण खरा ठरतो.

( ५ ) निसर्गाला विनय प्रिय आहे. त्यास घमेण्ड सहन होत नाहीं. मग ती सत्याबद्दल का असेना ?

( ६ ) पुढारी म्हणजे नुसती प्रतिज्ञा करणारा मनुष्य नव्हे प्रतिज्ञा पूर्ण करण्याची ताकदही पुढाऱ्याचे अंगात असली पाहिजे.

( ७ ) शिवाजी राष्ट्र स्वातन्त्र्य सम्भाळायला गेला गान्धी सत्य संभाळायला गेला. ते राष्ट्र स्वातन्त्र्याकरिता शिवाजीने सत्याचा बळी दिला गान्धींनी सत्याकरिता राष्ट्र स्वातंत्र्याचा बळी दिला

( ८ ) सत्य सम्भाळायला गेले तर स्वातन्त्र्य सम्भाळणे जड जाते. स्वातन्त्र्य सम्भाळायला गेले तर सत्य सम्भाळणे कठिण पडते. सत्य सम्भाळुन कोणी राष्ट्र स्वातन्त्र्य मिळवू शकेल काय ?

# प्रकरण १८ वें.

## श्री शिवाजी महाराजकी जय !

राष्ट्राचा पुढाकार घेण्यास मनुष्याला आपलें मन फारच उंच अन्तरावर न्यावें लागतें. सर्व संसार, सर्व सम्बन्ध, सर्व नातीं, सर्व मैत्री, सर्व परिवार, सर्व व्यवहार ह्याचेवर फार उच्च ठिकाणीं जाऊन ज्याला ह्या सर्वांचें अलिप्तपणानें आकलन करता येतें तोच पुरुष राष्ट्राचे नेतेंपण स्वीकारण्यास लायक होतो. जो ह्यापेक्षा खालचे ठिकाणावर येतो व आता सांगितलेल्या गोष्टींपैकीं एखाद्या गोष्टींत गुन्तून जातो तो पुढारी होण्यास नालायक होय. पुढारी होणाऱ्या मनुष्याचे सर्व अभिमान गलित झाले पाहिजेत राष्ट्राचा अभिमान तेवढाच त्याचे ठिकाणीं उरला पाहिजे.

खरा वैद्य किंवा डॉक्टर कोण ? जो सुश्रुताचा किंवा वाग्भटाचाच अभिमान धरतो, जो ॲलोपथी किंवा होमिओपथीच खरी मानतो, जो निसर्गचिकित्सा किंवा सूर्यकिरणेंच उपयोगात आणतो तो काय ? नव्हे, तो खरा वैद्य किंवा डॉक्टर नव्हे. तो फक्त त्या त्या मार्गाचा अभिमानी होय. खरा वैद्य किंवा डॉक्टर ह्मटला म्हणजे तो असला आकुंचित अभिमान कधीही धरीत नाही. त्याचेजवळ फक्त एकाच गोष्टीचा अभिमान असतो आणि तो हा कीं मी दुसऱ्याचे रोग बरे करीन ! मग त्याकरिता ह्याला वाग्भट तर त्याला युनानी, तिसऱ्याला होमी-

औषाधी तर चवथ्याला निसर्गचिकित्सा असें करावें लागलें तरी हरकत नाहीं. सर्वांची तब्येत सारखी असणे कधीही शक्य नसतें. सर्वांना एक औषध चालत नाहीं. सर्वांची एक चिकित्सा करता येत नाहीं. ह्मणून ह्याला ही आणि दुसऱ्याला दुसरी पद्धति लावली तर त्यांत बिघडलें काय ? त्यात कदाचित् वाग्भटाला धोका येईल. पण रोग्याच्या जिवाला कधींही धोका यायचा नाही.

जो वैद्यराज इतक्या उदार मनानें चालतो तोच खरा वैद्य व त्याच्याच हातून रोग बरे होतात. खऱ्या वैद्याला सर्व चिकित्सा व सर्व "पथी" आल्या पाहिजेत. कशावरही भलती आवड व कशाविषयींही भलती द्वेषबुद्धि त्याचे मनात असता उपयोगी नाही एवढेंच काय पण औषधाच्या बरोबर विषें वापरण्याचीही त्याच्या मनाची तयारी असली पाहिजे. काहीं रोग असे असतात की ते विषानेच बरें होतात. त्याचेवर औषधे चालतच नाहींत ! औषधें कितीही गुणकारी असलीं तरी त्याचा त्या रोगावर काहीएक उपयोग होत नाहीं.

आणि आपण जें "असत्य" "असत्य" म्हणतो तें तरी काय आहे ? तेंही एक प्रकारचें विषच ! तें रोज उपयोगात आणण्याच्या लायकीचें नाहीं. तशी त्याची रुचि नसते किंवा स्वादही नसतो. फक्त कित्येक दुर्धर रोग असे असतात की त्यावेळीं हें विषच द्यावें लागतें. अशा वेळीं सत्याचा काहीं उपयोग आहे काय ? नाहीं. उलट सत्यामुळें अशा वेळीं प्राण जायचा मात्र प्रसंग येतो.

हे "रोग" कोणंत ह्याचें पुन्हां चर्वितचर्वण नको. मागें १२, १३, १४ ह्या प्रकरणांत ह्यांचेंच वर्णन केलेलें आहे. ह्या सर्व प्रसंगांत असत्याचाच अवलम्ब करावा लागतो. तिथें सत्य आचरीत बसणें म्हणजे सत्याचाच खून करण्यासारखें आहे.

पण त्यामुळें सत्याची किंमत कमी होते काय? नाही. कारण सत्य हे अन्न आहे व असत्य हें विष आहे. औषधी क्रियेंत विषांचें महत्त्व कितीही वर्णन केलेलें असलें तरी रोजच्या रोज अन्नाचीच गरज आहे हें निर्विवाद आहे

आणि ह्यासाठींच सत्याचा उपदेश एकसारखा चाललेला असतो कारण जग जर वृद्धि पावणार असेल—पुष्ट होणार असेल—तर ते सत्याच्याच योगानें होईल, असत्याचे योगाने होणार नाहीं. कुटुम्बात नवरा, बायको. मुलें हीं एकमेकांशीं खोटे बोलली तर एकही कुटुम्ब चालणार नाही, आणि प्रत्येक मनुष्य दुसऱ्याशी खोटेपणानें वागायला लागला तर एकही दुकान किंवा धन्दा निभावणार नाहीं कुटुम्बें, गावे, शहरे हीं सर्व सत्याच्या आधाराचर चाललेलीं आहेत. त्याचा सत्याचा आधार नाहीसा होईल तर बेबन्दशाही माजेल व गावे आणि प्रान्त उजाड होऊं लागतील.

दुसऱ्या बाजीरावाचे कारकीर्दींत मुलुख ओसाड पडायला लागले त्याचें कारण असें कीं सत्याचा आधार कमी झाला. कुणी एकमेकाशीं करार केले तर ते करार पाळले जातील असा लोकाना भरंवसा वाटेनासा झाला. येणेंदेणें वेळचे वेळीं वसूल होईल हा भरंवसा

उडाला. व्यापारी लोकांना आपल्या मालाचीही शाश्वती वाटेनाशी झाली. चोंहोंकडे पेण्ढार माजलें आणि "बळी तो कानपिळी", असें होऊन व्यापारधन्दा बसला. अशा स्थितीत वाणीउदमी गांवांत येणार कसे व लोकांनीं गांवांत रहावें कसें ?

आणि जे कुटुम्बाचें, गावाचें व प्रान्तांचे तेंच राज्याचेही आहे. दोन राज्यें जवळ जवळ असलीं ह्मणजे त्यांपैकीं ज्यात सत्य असतें ते भरभराटीला यत व ज्यांत असत्य असतें त्याला ओहोटी लागते. एकामध्यें वस्ती वाढत जाते व दुसऱ्यामधील कमी होत असते. शेतकरी, व्यापारी धन्दारोजगारवाले हे सर्व एका राज्यातून दुसऱ्या राज्यात स्थलान्तर करीत असतात. कारण ह्या सर्वांना सुरक्षितपणा हवा असतो व सत्य असेल तरच हा सुरक्षितपणा राहतो, नाहींतर रहात नाहीं.

ह्याप्रमाणें सर्वत्र सत्याचें अधिष्ठान दिसत असल्यामुळें सत्याची जरूरी पूर्वींच्या लोकांचे लक्ष्यांत आली व सत्य वाढल्यास सुख वाढेल असें त्याना वाटायला लागलें. आणि बऱ्याच अंशीं हें खरेंही आहे. उद्या सर्वत्र सत्य सुरू होऊं द्या कीं खरोखर सुखच सुख! मग पोलीस नको, कोर्ट नको, तुरुंग नको, वकील नको, रजिष्टरकचेरी नको, प्रॉमिसरी नोट नको किंवा एक आण्याचें टिकिटही नको. मग कोणी कोणाशीं बेइमान होणार नाहीं कीं कोणी कोणाची चोरी करणार नाहीं. जगात असत्य आहे त्यामुळेच सर्व लचाण्ड पाठीमागें लागलेलें आहे. असत्याला प्रतिबन्ध करण्याकरितां ह्या सर्व गोष्टी आहेत. जर असत्यच नसेल तर ह्या गोष्टी तरी कशाला राहतील ?

सत्याविषयींचा आदर जो परम कोटीला चढला तोही यामुळेंच चढला. सत्याच्या अतिशय आदरामुळेंच पातिव्रत्य, स्वामिनिष्ठा वगैरे उच्च कल्पना निघाल्या. मनानें एकदा पति वरला तो वरला, मग

न फिरे जरि चराचरां
कण्ठ चिरियला

हें उदात्त तत्त्व ह्यामुळेंच निघाले. स्वामिकार्यात प्राण अर्पण करणारे खण्डो बल्लाळ, धन्याच्या अगोदर स्वतःचे शरीर भोंसकून घेणारे चाफाजी टिळेकर, राजपुत्राच्या बचावाकरिता स्वतःच्या मुलाचा बळी देणारी पन्नादाई किंवा आपला राजा स्वतःच्या हातानें राजवैभवाला आग लावीत आहे असें माहीत असताही त्याचें राजवैभव सम्भाळण्याकरितां धारातीर्थी कण्ठस्नान करवून घेणारे बापू गोखले हे ह्यामुळेंच उत्पन्न झाले. सीता, द्रौपदी आणि सावित्री ह्यामुळेंच निर्माण झाल्या आणि स्वप्नातसुद्धा खोटे न बोलणारा महाभाग हरिश्चन्द्र ह्या सत्याच्या जाज्वल्य अभिमानामुळेंच प्रसिद्धीला आला.

एवढेंच नव्हे तर सत्याचें आणि परमेश्वराचें एकरूपत्व मानण्यात आलें. "सत्यापरता नाही धर्म" ही वचनें निघालीं. "सर्वं सत्ये प्रतिष्ठितं" ह्या तत्त्वाचा गजर होऊं लागला आणि "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" अशी परमेश्वराची व्याख्या झाली. सत्य, सत्य, सत्य असा सर्वत्र बोलबाला झाला. सत्याच्या कीर्तीनें त्रिभुवन

कोन्दलें. जें सत्य तोच परमेश्वर आणि परमेश्वर म्हणजेच सत्य ही समजूत प्रबळ झाली.

सूक्ष्म विचार केला तर ही समजूत काहीं खोटी नाहीं. सत्य हें असेंच थोर आहे व दिवसेंदिवस सत्याचाच जय होत चाललेला आहे. पूर्वी ज्या मिथ्या कल्पना जगांत होत्या त्या आज नामशेष झालेल्या आहेत व त्यांचे जागीं सत्य कल्पना येऊन बसलेल्या आहेत. पूर्वी पृथ्वी ही चौकोनी आहे अशी समजूत होती. पूर्वी सूर्य पृथ्वीचे भोवती फिरत आहे असें लोक मानीत होते. पूर्वी ग्रहणाचे वेळीं सूर्यचन्द्राचा ग्रास झाला असें वाटून लोक शोक करीत होते. आज तसा शोक कोणी करीत नाहीं. आज प्रत्येक पिढीस सत्यावरील पटल नाहीसें होत चाललेलें आहे. "सायन्स" च्या प्रत्येक शोधाबरोबर सत्याची एक एक बाजू नजरेला येऊं लागलेली आहे. असत्याच्या खाणींत दडलेलें सत्य सध्या ज्यास्त ज्यास्त उजेडांत येत आहे व त्याचेवरील धूळ रोजच्या रोज काढून टाकली जात आहे.

सत्याच्या अभिमानांत सॉक्रेटीस रसातळाला गेला, पण त्याचे मागून त्याचे सत्य उदयाला आलें. सत्याच्या अभिमानामुळें येशू ख्रिस्त फांशीं गेला, पण त्याचेनन्तर त्याचा धर्म उदय पावला. सत्या-मुळें तुकारामाला पीडा झाली, पण त्याचेमागून त्याची सत्य वाणी अभंग झाली. सत्याला कोणी फोडो, झोडो, तुरुंगांत अटकावो किंवा फांशीवर लटकावो, पण अन्तीं त्याचाच जय होणार ! सत्याचा जय झाल्याशिवाय कधींही राहणार नाहीं.

आणि अवरंगजेबाचें उदाहरण ? अद्यापि हे उदाहरण घेणें थोडेसें घाईचे आहे कारण अजून शिवाजी आणि अवरंगजेब ह्याचेवर थोडी ज्यास्त शतकें जायची आहेत ह्या शतकाचे पोटात काय काय चमत्कार आहेत हें आजच सागता यायचे नाही. पण एवढी मात्र गोष्ट खरी की सम्भाजीच्या अगाची मालडी काढून ज्या हिन्दुधर्मास बुडवायला अवरंगजेब श्रमला तो हिन्दुधर्म अद्यापिही बुडालेला नाहीं. सम्भाजीच्या ज्या पुत्राला अवरंगजेबाने बन्दीवान् केलें त्याच्याच प्रधानाची (पेशवे बाळाजी विश्वनाथ याची) पायधरणी करण्याचा प्रसंग अवरंगजेबाचे वंशजाना आला. त्या प्रतापवन्त शाहूच्या नोकराचा नोकर जो महादजी शिन्दे त्याने त्याच अवरंगजेबाच्या वाड्यावर मोर्चे लावले आणि गुलामकादराने ज्या वेळी दिल्लीच्या बादशहाचे डोळे फोडले त्या वेळी त्याचे रक्तमय अश्रु पुसायला अवरंगजेबानें रक्तबम्बाळ केलेल्या मराठ्यांचेच हातरुमाल पुढें आले.

एवढेंच काय, कालाच्या ओघाबरोबर पुण्यश्लोक शिवाजीमहाराजाची योग्यताही लोकांच्या ज्यास्त ज्यास्त लक्ष्यांत येऊं लागलेली आहे. त्याना लुच्चे ह्मणणारे लुच्चे व दरवडेखोर ह्मणणारे दरवडेखोर आज आपआपल्या लांखण्या बोथट करून बसलेले आहेत. पूर्वी मराठ्यांनी बंगाल प्रान्तावर घोडेस्वार सोडून तेथें आपला प्रवेश करून घेतला. आज त्यांचे ते घोडेस्वार राहिलेले नाहींत. तथापि श्रीशिवाजी महाराजाच्या कीर्तीचे विजयी शिलेदार आज बंगाल प्रान्तांत शिरून तिथल्या कवींना, लेखकांना व इतिहासकारांना आज आपले

बन्दीवान् करून ठेवीत आहेत. आज महाराष्ट्राइतकाच बंगाल प्रान्तही श्रीशिवाजी महाराजांच्या कीर्तीनें दुमदुमत आहे व त्यांचा जन्मकाल ठरवायला राजवाड्यांच्या बरोबरीने यदुनाथ सरकार पुढें येत आहेत. हीं सर्व विजयाचींच चिन्हें नव्हेत काय ? आणि ह्या विजयाचा कळस करण्याकरितांच कीं काय जॉर्ज बादशहांचे पुत्र हिंदुस्थानात आले असता त्यांनीं श्रीशिवाजीमहाराजाच्या पुण्य स्मृतीवर स्तुतीची छत्रचामरें धरलीं ! मग श्रीशिवाजी महाराजकी जय असे ह्मणायला काय हरकत आहे ?

---

**प्रकरण १८ वें.**

( १ ) राष्ट्राचा पुढाकार घेणाऱ्यानीं आपले मन अत्यन्त उच्च अन्तरावर नेऊन सत्य—असत्य ह्यांचा निःपक्षपातानें विचार केला पाहिजे.

( २ ) असत्य हें विषासारखें आहे. ज्याप्रमाणें काहीं रोगात विषच उपयोगीं पडतें त्याप्रमाणें कांहीं ठिकाणीं असत्य आचरल्यावाचून भागत नाहीं.

( ३ ) पण त्यामुळें सत्याची किंमत कमी होत नाहीं. सर्व जगत् सत्यावरच चाललेलें आहे व सत्य हेच जगताचें ध्येय आहे.

( ४ ) अन्तीं सत्याचाच जय होणार आहे. आजही ह्यांचीं शुभ चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं आहेत.

( ५ ) "सायन्स" मुळें सत्यावरील उडणारीं पटलें व उत्तरोत्तर लोकांच्या पालटत जाणाऱ्या समजुती हें ह्याचेंच चिन्ह होय.

( ६ ) अवरंगजेब जय पावला तरी त्याचें कार्य बुडालें. येशू ख्रिस्त फांशीं गेला तरी त्याचा धर्म त्याचे पाठीमागून भरभराटीला आला.

# प्रकरण १९ वें.

## सत्याचा रणदुन्दुभि

———:o:———

तेव्हां अन्तीं सत्याचाच जय होणार ही गोष्ट खरी आहे. " सत्यं जयते "—" सत्यमेव जयते "—ह्यांत तिळमात्र संशय नाहीं. परमेश्वरही सत्यस्वरूप आहे व सत्य हेंच मनुष्यास परमेश्वराची योग्यता प्राप्त करून देणारें आहे.

पण जर सत्याचा अन्तीं खात्रीनें जय होतो तर त्याचा प्रथम देखील जय का होऊं नये ? जो पाहिलवान अखेरीस कुस्ती जिंकतो त्यानें अगोदर तरी कुस्तींत कां पडावें ?

मागे एका प्रकरणांत

प्रथम पराभव+अन्तीं जय=सत्य

असे समीकरण आपण माण्डलेलें होतें. दुसऱ्या एका प्रकरणांत सत्याचा शेवटीं देखील जय होत नाहीं असें आपण पाहिलेलें होतें. पण हें अनुमान बरोबर नाहीं असें आता दिसतें. सत्य हें शेवटीं खास जय पावतें ! प्रश्न एवढाच राहतो कीं प्रथम तरी त्याचा पराभव का व्हावा ?

पण ह्या प्रश्नाचा उलगडा करण्यास आपण एक उदाहरण घेऊं. अशी कल्पना करा कीं एका राजाची विजयाबद्दल फार प्रसिद्धि आहे व आजपर्यन्त त्याचा एकाही युद्धांत पराभव झालेला नाहीं.

त्याची ही कीर्ति ऐकून एक शिपाई त्याच्या सैन्यात दाखल झाला आणि त्याचे बरोबर लढाईला निघाला. आता हा शिपाई एका विजयी राजाचे सैन्यांत दाखल झाला ही गोष्ट खरी आहे व ह्या युद्धांतही तो राजा विजयच मिळविणार ही गोष्ट निश्चित आहे. परन्तु ह्या दोन्ही गोष्टी खऱ्या असल्या तरी त्या युद्धात हा शिपाई जिवन्त राहील ह्याचा काय भरंवसा? त्याचे अंगांत तेवढे कौशल्य, तेवढें शौर्य व तेवढी चपळाई असली तर तो जिवन्त राहील. तें जर त्याचे अंगात नसेल तर एक गोळी किंवा बाण सूं सूं करीत येऊन त्याचा प्राण घेईल. पण त्याचा प्राण गेला म्हणून तो राजा अपेशी आहे असे ठरत नाहीं किंवा शिपाई मरून पडल्या मुळें लढाईत पराजय होईल असेंही नाहीं. ती लढाईसुद्धां राजा जिकील, परन्तु त्यामुळें शिपायाचे प्राणमात्र त्याला परत मिळाणार नाहींत.

सॉक्रेटीस, येशू ख्रिस्त, गॅलिलियो, तुकाराम, सम्भाजी हे सर्व सत्यरूपी राजाचे शिपाई होते. ते विजयी राजाचे शिपाई होते. त्यांचा राजा—सत्य—कधींही हार पावला नाहीं. तो प्रत्येक लढाईत जय पावला, पण लढाई आटपण्यापूर्वींचि ते घायाळ झाले—मारले गेले!

सलतान, सीझर, शिकन्दर—ह्यांपैकीं कोण अपेशी होते? विजयश्रीनें कुणाला माळ घातली नाही? पण त्यांच्या सैन्यापैकीं प्रत्येक जण जिवन्तच राहिला काय? त्यांचे सैन्यांत कोणी कधींही मारला गेला नाहीं काय?

पण हे जे शिपाई मारले जातात त्याचेकडे पाहून-सॉक्रेटीस, येशू-ख्रिस्त, सम्भाजी याचेकडे पाहून—आपण असें ह्मणतों कीं सत्याचा प्रथम पराभव होतो. लढाई सम्पायचीसुद्धा आपण वाट पहात नाहीं. परन्तु आपलें हें तर्कज्ञान खरें नाहीं. तो सत्याचा पराभव नव्हे. ती लढाईपैकीच एक चकमक आहे. ह्या चकमकीत सत्याचे काहीं शिपाई मारले जायचेच ! आणि लढाई जितकी मोठी व दीर्घ कालाची असेल तितकी मारल्या जाणाऱ्या शिपायाची संख्या मोठी असायची !

तेव्हा सत्याचा शेवटीं जय होतो एवढेंच नव्हे तर अगोदरपासूनही सत्याचा जयच होत असतो. पण आपण अल्पधीरी माणसें युद्धाच्या सुरवातीलाच घाबरतो व एकदोन शिपाई वायाळ झाल्याबरोबर सत्याचा पराभव झाला अशी भलती समजूत करून घेतों.

सत्य—असत्याचे लढाईत सत्याचा एकही शिपाई घायाळ होऊं नये अशी जर इच्छा असेल तर सत्याचा प्रत्येक शिपाई असत्याच्या शिपायापेक्षा सामर्थ्यवान् असला पाहिजे. आपण सत्याचे शिपाई आहोत एवढ्यावरच कोणी सुरक्षितता मानू नये. सत्य—असत्याचे युद्धात जरी सत्य जय पावणार असलें तरी सत्याचे शिपायांनीं आपल्या प्राणरक्षणाची भिस्त स्वतःचे सामर्थ्यावरच ठेविली पाहिजे.

शिवाजीचा जरी जय व्हावयाचा असला तरी त्यानें प्रत्येक शिपायच्या प्राणाचा मक्ता घेतलेला नसतो. त्याचे सैन्यातील तानाजीसुद्धा प्रसंगवशात् मृत्यु पावेल, मग सामान्य शिपायाची काय कथा?

आणि जर अंगीं सामर्थ्य नसेल तर मग असत्याचा आश्रय करण्यात येतो. हा असत्याचा आश्रय कुणी आनन्दाने करीत नाहीं. यांत कुणाला हौस नसते. पण सामर्थ्याच्या अभावामुळें तसें करणें भाग पडतें.

म्हणून ज्याला ह्या जगात सत्य गाजवायचें असेल त्यानें सत्याबरोबर आपले अंगांत सामर्थ्य आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हें सामर्थ्य अंगांत असेल तरच त्याचा बचाव होईल व तरच त्याच्या कार्याचा विजय होईपर्यन्त तो जगेल. नाहीं तर त्याचे कपाळीं मृत्यु, क्लेश व अनन्त यातना ह्या अचूक ठेवलेल्या आहेत असे खास समजावें.

आजपर्यन्त जगानें ह्या बाबदीत फार चूक केलेली आहे. आजपर्यन्त ह्या बाबदींत सत्याभिमानी लोकानींही फार चूक केलेली आहे नुसत्य सत्याच्या अभिमानावर जगानें आजपर्यन्त अनेक व्यक्तींचें चोज केलेलें आहे—त्याना मार्गदर्शक मानलेलें आहे—त्याचे गळ्यात फुलांच्या माळा घातलेल्या आहेत.

परन्तु ह्या योगानें त्यांना सुख झालें नाही. उलट त्यामुळें त्याचे अंगावर अवजड जबाबदाऱ्या येऊन पडल्या, दुष्ट लोकांचे द्वेषास ते पात्र झाले, तयारी नसतांना झुंज करण्याचा त्यांचेवर प्रसंग आला आणि भयंकर हालअपेष्टांत त्यांचा अन्त झाला.

सत्याच्या प्रत्येक शिपायाचे अन्तःकरणावर ही गोष्ट बिम्बविली पाहिजे कीं तुला सत्याचा अभिमान असेल तर बरोबर सामर्थ्य

घेऊन तूं परिस्थितीशीं झुंजायला ये. तोंपर्यन्त आपली तयारी झाली नाहीं असेंच मान. तोंपर्यन्त विजयाची आशा धरूं नकोस. तोंपर्यन्त मी असत्याचा मोड करीन असल्या खोट्या कल्पनेंत राहूं नकोस.

पण हें सामर्थ्य घेऊन यायचें ह्मणजे काय करायचे ? पुढाऱ्यांनीं असत्यापाशी कसे झगडायला यायचें? कोणतीं कोणतीं साधनें जय्यत करून त्यांनीं ह्या झगड्याला आरम्भ करायचा ?

ह्याचें उत्तर अर्थात्च शरीर, सम्पत्ति व बुद्धिमत्ता हें आहे. असत्याशीं झुंज करतांना हीं तिन्ही साधनें जय्यत ठेवलीं पाहिजेत आणि मग सत्याचा रणदुन्दुभि वाजविला पाहिजे. शरीरसामर्थ्य पैसा आणि बुद्धिमत्ता ही तिन्हीं प्रकारची साधनसामग्री तयार असेल तरच सत्याच्या शिपायाला जय येईल नाहींतर येणार नाहीं. शेवटीं सत्याला जय मिळायचा तो मिळेल, पण शिपाई ठार होऊन गेल्यानंतर मग तो विजय मिळेल.

हीं साधने नव्हती ह्मणून येशू ख्रिस्त फाशीं गेला. हीं साधनें नव्हती ह्मणून सॉक्रेटीस प्राणास मुकला. ही साधनें नव्हती ह्मणून तुकारामाचा छळ झाला.

सत्याचे शिपायानों, सामर्थ्यवान् होऊन रणभूमीवर या. माणसें जमवा, पैसा जमवा, बुद्धिमतेची कमाल करा. ही तिन्ही प्रज्वलित ठेवाल तरच तुमची फत्ते होईल, तरच असत्य पळून जाईल आणि तरच अन्याय व जुलुम ह्याची दाणादाण होईल.

पण हीं तुमचे जवळ नसतील तर तुमचीच दाणादाण उडेल.

मग तुह्मांला जयाची आशा नको. विश्वविजयी सत्य दुबळ्याना तारण्याकरितां जन्मलेलें नाहीं त्याचा प्रत्येक शिपाई सामर्थ्यवान् व रणधुरंधर पाहिजे. दुबळ्या शिपायाना ते जवळ घेईल, त्याचेवर माया करील, पण ते येशू ख्रिस्त असले तरी ते त्यांना तारणार नाही. ही साधनें नव्हतीं म्हणून आलफ्रेडनें असत्य आचरलें---म्हणूनच शिवाजीनें अफझुलखानाचा खून केला. साधनाची कमतरता त्यानी असत्याने भरून काढली.

त्यांचा हेतु उच्च होता. राष्ट्रस्वातंत्र्य हा त्याचा हेतु, होता पण सत्य साधनांनी तो हेतु तडीस जाईना ह्मणून त्यांनी असत्य आचरलें. त्यांनीं असत्य आचरून सत्याची सेवा केली. सत्याकरिता त्यानीं असत्य स्वीकारलें.

बोला, ह्या करितां तुह्मी त्याना दोष द्याल काय ? अशा वेळीं तुह्मी काय कराल ? तुह्मी त्याच्या सत्य हेतूकडे पहाल ? कीं तुह्मी त्याच्या असत्य वर्तनाकडे पहाल? तुह्मी त्याची योग्यता त्याच्या अन्त - करणावरून ठरवाल कीं त्याच्या वर्तनावरून त्याची योग्यता ठरवाल?

पण तुह्मी त्यांना दोषी ठरवाल तर दुर्धर रोगावर विषाचा उपयोग करणाऱ्या धन्वन्तऱ्यालाही तुम्हास दोषीच ठरवावें लागेल. ज्याने विषाचा उपयोग करूनही रोग्याचे प्राण वाचविले त्याला तुम्हास दुष्ट नराधमाच्या पंक्तीला बसविणें भाग पडेल.

पण असें करणें ह्मणजे सत्याचाच खून करणें होय. सत्याकरितां जे असत्य करितात त्याना कधींही दोषी मानता यायचें नाहीं.

त्यांना क्षमाच केली पाहिजे. त्यांना दोषमुक्त करून उच्च कोटींचे लोकांत त्याना जागा दिली पाहिजे.

सत्य ध्येयासाठी सत्य साधनाचाच जे उपयोग करतात ते सर्वात श्रेष्ठ पण साधनांच्या कमतरतेमुळें सत्याकरितां कोणीं असत्य आचरलें तर ते निन्द्य नाहींत ! तो त्यांच्या अशक्तपणाचा परिणाम आहे आणि अशक्तपणाला हांसणें ह्मणजे जोर, जबरदस्ती व जुलूम ह्याना उत्तेजन देण्यासारखें आहे.

---

**प्रकरण १९ वें**

( १ ) सत्याचा प्रथम पराभव होतो ही समजूतही खरी नाहीं.

( २ ) सत्य हे एकाद्या विजयी बादशहाप्रमाणें आहे. त्या बादशहास विजय मिळेपर्यंत काहीं शिपाई मारले जातात, परन्तु त्यास विजय प्राप्त होण्याचे रहात नाहीं.

( ३ ) सत्य–असत्याचे लढाईत सत्याचा एकही शिपाई मरू नये अशी जर इच्छा असेल तर सत्याचा प्रत्येक शिपाई असत्याच्या शिपाया पेक्षा सामर्थ्यवान् असला पाहिजे.

( ४ ) सत्याच्या प्रत्येक शिपायाचे अन्तःकरणावर ही गोष्ट बिम्बविली पाहिजे कीं तुला सत्याचा अभिमान असेल तर बरोबर सामर्थ्य घेऊन परिस्थितीशीं झुजायला ये.

( ५ ) विश्वविजयी सत्य दुबळ्याना तारण्याकरिता जन्मलेले नाहीं.

( ६ ) ज्याचे अंगात परिस्थितीशीं झुजण्या इतके बळ नसते त्याना नाइलाजानें असत्याचा स्वीकार करावा लागतो.

( ७ ) पण त्याबद्दल ते दोषास पात्र नाहींत. दुर्धर रोगात विषाचा उपयोग करण्यासारखेंच त्यांचे कृत्य आहे.

# प्रकरण २० वें.

## चोरी कशी करावी ?

——:०:——

जगांत चातुर्वर्ण्य आहे कीं नाहीं ह्याबद्दल अनेक वेळा चर्चा चाललेली असते. कोणी ह्मणतात कीं जगांत चातुर्वर्ण्य आहे. कोणी ह्मणतात कीं जगांत चातुर्वर्ण्य नाहीं. परन्तु खरी स्थिति अशी आहे कीं जगांत चातुर्वर्ण्य आहे व जगातील प्रत्येक मनुष्य ह्यापैकीं कोणत्याना कोणत्यातरी वर्णाचा आहे.

मग तें चातुर्वर्ण्य कोणतें ? तें चातुर्वर्ण्य ह्मणजे ब्राह्मण—क्षत्रिय—वैश्य—शूद्र हें काय ?

नाहीं, जगांतील चातुर्वर्ण्य हें नव्हे. ब्राह्मण—ब्राह्मणेत, स्पृश्य—अस्पृश्य हे आपआपसांत कितीही भाण्डले तरी जगातील चातुर्वर्ण्य हें नव्हे. भगवद्गीतेनें " चातुर्वर्ण्यं मया सृष्टं " अशी जी प्रतिज्ञा भोगलेली आहे ती ह्या चातुर्वर्ण्यासम्बन्धानें खास नाहीं. जगांतील चातुर्वर्ण्य अगदी निराळें आहे व तें प्रत्येक धर्मांत आणि प्रत्येक राष्ट्रांत आहे. आह्मी जातिभेद पाळीत नाहीं अशी इंग्लिश लोकानी जरी नाकांनीं वागीं सोललीं तरी त्यांच्यांत हे चातुर्वर्ण्य आहे, काबूलकन्दाहारमध्यें हें चातुर्वर्ण्य आहे, चीनजपानमध्यें हे चातुर्वर्ण्य आहे—जेथें जेथें मनुष्यप्राणि आहे तेथें तेथें हें चातुर्वर्ण्य आहे. हिन्दु, मुसलमान, खिस्ती, पार्शी वगैरे एकही धर्म असा नाहीं की

ज्यात हें चातुर्वर्ण्य नाहीं. जातिभेदावर उसळणारे व जातिभेदाचा उच्छेद करूं पाहणारे असे जे कोणी लोक असतील त्याच्यांत देखील हे चातुर्वर्ण्य आहे

कारण सर्व मनुष्यजातीचे मुख्य दोन भाग आहेत. ते दोन भाग ह्मणजे जीं मनुष्यें केवळ उच्च हेतूसाठीं आयुष्याचा उपयोग करतात तीं व ज्याचे आयुष्यात उच्च हेतु नसतो तीं.

मनुष्य उच्च हेतूसाठीं आपलें आयुष्य उपयोगांत आणीत आहे असें केव्हा समजायचें' ज्या वेळीं स्वतःचें सुख, द्रव्य, सन्तति, इष्टमित्र, कीर्ति, वगैरे गोष्टींसाठीं तो प्रयत्न न करता किंवा स्वतःसाठीं सूड वगैरे उगविण्याचे इच्छेनें प्रेरित न होता तो केवळ परहितासाठीं झटत असेल त्यावेळीं ! ज्या ज्या मानानें मनुष्याच्या कृतींत स्वतःचा स्वार्थ असेल त्या त्या मानानें त्याची श्रेष्ठता कमी ! जो केवळ स्वार्थासाठींच झटतो तो दुसऱ्या वर्गाचा मनुष्य होय.

ह्याप्रमाणें मनुष्याच्या मुख्य दोन जाति ठरविल्यानन्तर त्याच्या आणखी दोन जाति ठरविता येतात. त्या जाति ह्मणजे आपल्या हेतूंसाठीं सत्याचा उपयोग करणारीं माणसें व आपल्या हेतूंसाठीं असत्याचा उपयोग करणारीं माणसें ! ह्या दोन जाति सर्वत्र दृग्गोचर असतात—मग तीं माणसें उच्च हेतूंसाठीं झटत असोत किंवा स्वार्थासाठीं झटत असोत.

ह्मणजे जगातील चातुर्वर्ण्य संकलित तऱ्हेनें माण्डायचें ह्मणजे ह्याप्रमाणें माण्डता येईलः—

उच्च हेतु + सत्य वर्तन = प्रथम वर्ग
उच्च हेतु + असत्य वर्तन = द्वितीय वर्ग
सामान्य हेतु + सत्य वर्तन = तृतीय वर्ग
सामान्य हेतु + असत्य वर्तन = चतुर्थ वर्ग

नेपोलियन्, सीझर, शिकन्दर वगैरे माणसें आपणास श्रेष्ठ वाटतात. कारण जगात ते अद्भुत पराक्रम करून गेलेले आहेत. इतिहासात त्यांचीं नावें फार चमकलेलीं आहेत. परन्तु वरील चार वर्गांच्या साच्यात त्याना व्रतलें म्हणजे त्याची खरी योग्यता काय आहे हे आपणास कळतें. स्वत:चें वैभव वाढवावें ह्यापेक्षा त्याना ज्यास्त महत्त्वाकाक्षा नव्हती.

कोणी कोणी असें विचारतील कीं आपल्याबरोबर आपल्या राष्ट्राचेंही वैभव वाढवावें असा ह्या लोकाचा उद्देश नव्हता काय ?

असेल ! त्याचा तसाही उद्देश असेल. पण त्या उद्देशालाही विशेष किमत नाहीं. आपलें स्वत:चें वैभव वाढवावें हा हेतु जसा स्वार्थप्रेरित आहे तसाच आपल्या राष्ट्राचें वैभव वाढवावें हा हेतुही स्वार्थप्रेरितच आहे. एकापेक्षा दुसऱ्यात स्वार्थाचा अंश जरा कमी असतो एवढेंच. आपल्या राष्ट्राचें वैभव वाढविण्यासाठी जे दुसऱ्याचे देश काबीज करतात ते लोक खास उच्च दर्जाचे नव्हेत. ते नीचच लोक होत.

कोलम्बस, वास्को डि गामा, वॉरन् हेस्टिंग्ज—कोण म्हणेल कीं उच्च दर्जाचे लोक होते ? ह्याना श्रीशिवाजी महाराजाइतके

श्रेष्ठ स्थान कोण देईल ? आपल्या देशाच्या उत्कर्षाकरिता ज्यानी दुसऱ्या देशाच्या माना गुलामगिरीच्या जोखडात अडकावून दिल्या त्याना वरची जागा कोण देऊ शकेल ? हे सर्व कमी किमतीचे लोक होते. हे लोक असे होते कीं ज्याच्या कृत्याबरोबर हजारो लोकाचे शाप वातावरणात मिसळले गेले, ज्याच्या कर्तबगारीबरोबर हजारो लोकाचा तळतळाट त्यांना मिळाला.

कैझर, कर्झन्, किचनर हेही अशापैकींच लोक होत. क्लाइव्ह हाही नीच मनुष्य होता. स्वार्थपरायण माणसें त्याचीं स्तुति-स्तोत्रे खुशाल गावोत- पण चातुर्वर्ण्याच्या सार्वत्रिक विभागात त्याना उच्च स्थल केव्हाही प्राप्त होणार नाहीं.

दुसऱ्याचे स्वातंत्र्य हरण करणारे—ह्याची कोण प्रशसा करील ? दुसऱ्याना गुलामगिरीच्या कढईत टकलणारे—ह्याची कृति कुणाला शीतल वाटेल ? दुसऱ्याना परवशतेचे क्लेश देणारे—ह्याची परोपकारी पुरुषात कोण गणना करील ?

परोपकारी पुरुष ते कीं जे आपल्या देशाला पारतंत्र्यातून सोडवितात ते परोपकारी पुरुष की जे आपल्या देशावरील पारतंत्र्याचा डाग पुसतात. ते परोपकारी पुरुष कीं जे गुलामगिरीचा विध्वंस करून आपल्या देशावर स्वातंत्र्याचे झेण्डे फडकावत त

कविजन त्यांचाच कीर्ती गाईल. इतिहास त्यानाच अग्रमान देईल. नीतिशास्त्र त्याचेच मंगल चौघडे सुरू करील.

श्रीशिवाजी मराराज ह्या वर्गापैकीं होते. आल्फ्रेड दि ग्रेट त्या वर्गापैकीं होता.

आणि हेंच मनुष्याचें कार्य ! हेंच त्याचे जन्मसाफल्य ! हेंच त्याचें जीवनसार्थक्य ! ह्यासाठींच मनुष्यानीं जगायचें व ह्यासाठींच त्यानीं आयुष्य उपभोगायचें !

मनुष्यांनीं स्वतःला नेहमीं एक प्रश्न विचारीत जावा—मी आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं कांहीं करीत आहे काय? ह्या प्रश्नाचें उत्तर जर "होय" असें आलें तर त्यानें समजावें कीं आपलें आयुष्य सार्थकीं लागत आहे. पण जर ह्याचें उत्तर तसें आलें नाहीं तर त्यानें थाम्बावें, विचार करावा, पश्चात्ताप करावा व आयुष्यास ताबडतोब निराळें वळण द्यावें.

एकच प्रश्न—सदोदित एकच प्रश्न—"मी आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं कांहीं करीत आहे काय?" हा एकच प्रश्न सर्व आयुष्याची कसोटी आहे. प्रत्येक मनुष्यानें ह्या कसोटीला लागलें पाहिजे. प्रत्येक मनुष्यानें ही कसोटी आपल्याला लावून पाहिली पाहिजे.

खरें सत्य हे ! ध्येयात्मक सत्य तें हें ! रोज तुह्मी खरें बोलत असाल, दुसऱ्याला फसवीत नसाल, तुमचे व्यवहार सरळ होत असतील, तुह्मी कधींही लांचलुचपत घेत नसाल, परन्तु तुमच्या आयुष्याचें ध्येय जर उच्च नसेल—आपल्या राष्ट्राला गुलामगिरींतून सोडवावें हें जर तुमचें ध्येय नसेल—तर तुमची सर्व सचोटी, तुमचा सर्व प्रामाणिकपणा, तुमचें सर्व सत्य कवडीकिमतीचें आहे. सत्याला सत्यता यायला नुसतें वर्तनच सत्य असतां उपयोगी नाहीं तर आयुष्याचें ध्येयही सत्य पाहिजे—उच्च पाहिजे.

तेव्हा मागील चातुर्वर्ण्यांत उच्च हेतूंचे जागीं 'सत्य' हा शब्द घालून आपण तें समीकरण पुन्हा माण्डूं—

सत्य ध्येय+सत्य वर्तन=प्रथम वर्ग
सत्य ध्येय+असत्य वर्तन=द्वितीय वर्ग
सामान्य ध्येय+सत्य वर्तन=तृतीय वर्ग
सामान्य ध्येय+असत्य वर्तन=चतुर्थ वर्ग

पुढारी लोकानीं जनतेस नुसतें सत्य वर्तनच शिकविता उपयोगी नाहीं, तर त्याना सत्य ध्येयाचें स्मरण करून दिलें पाहिजे. सत्य ध्येयाशिवाय सत्य वर्तन सफल होत नाहीं. जनतेस अशी शिकवणूक दिली पाहिजे कीं गुलामगिरींत राहू नका, आपलें राष्ट्र स्वतंत्र करा, आपल्या देशाला परवशतेतून सोडवा. कारण जोंपर्यन्त देश गुलामगिरींत आहे तोंपर्यन्त सत्य वर्तनाची प्रौढि व्यर्थ आहे. तेंच खरें सत्य वर्तन कीं जें सत्य ध्येयासाठीं—देशाच्या स्वातंत्र्यासाठीं—उपयोगी पडतें.

श्रीशिवाजी महाराजासारख्यानीं, आल्फ्रेडसारख्यांनी, श्रीकृष्णासारख्यानीं, सत्य ध्येयासाठी सत्य वर्तनाचाही बळी दिला. कारण सत्य ध्येय हें मनुष्याचें पहिले कर्तव्य आहे. सत्य वर्तनाची योग्यता त्याचे खालीं आहे. सत्य वर्तनाने सत्य ध्येय साधत असेल तरच त्याची शोभा ! नुसत्या सत्य वर्तनाची विशेष शोभा नाहीं.

परन्तु असें जरी असलें तरी आपल्यापुढें आपण चातुर्वर्ण्यापैकीं पहिल्या प्रतीचेंच ध्येय बाळगलें पाहिजे आणि सत्य ध्येयाचे सिद्धी

साठीं देखील असत्याचा डाग न लागेल अशी तजवीज ठेवली पाहिजे. सर्वांत उच्च वर्तन हे होय. हे वर्तन सर्व सद्वर्तनाची परम कोटि आहे. सर्व वन्द्यतेची ही परम सिद्धि आहे.

सर्वांत श्रेष्ठ पुरुष तोच होय कीं जो दण्ड थोपटून आपलें राष्ट्र परतंत्र्यातून सोडवील आणि हें कार्य करीत असताही असत्यतेचा अंश आपल्यास चिकटू देणार नाही.

पण जो असा निश्चय करील त्याचे मार्गांत अनन्त अडचणी उभ्या राहतील. पारतन्त्र्याचा उच्छेद करणाऱ्याचा समूळ उच्छेद व्हावा ह्यासाठीं शेंकडों दिशानी प्रयत्न होईल त्याला शेंकडों शत्रु उत्पन्न होतील. शेंकडो लोक त्याचेवर खवळतील--शेंकडों लोक त्याचा द्वेष करतील—शेंकडो लोक त्याचे नाशासाठीं टपतील

ह्या अडचणी नाहींशा करण्याकरिता आणि राष्ट्राचे स्वातंत्र्य सुलभ उपायानी परत मिळण्याकरिता अतिशय हुषारीने प्रयत्न केले पाहिजेत. शत्रूंचें शत्रुत्व शक्य नितके कमी करून, संकटाचें प्रखर टोंक शक्य तितके बोथट करून आणि विरोधातील तिखटपणा शक्य तितका सौम्य करून हे प्रयत्न करायचे ह्मणजे चोराच्या पावलानीच गेले पाहिजे. दुसऱ्या शब्दांत बोलायचे ह्मणजे असे कीं आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य ज्यांनीं हिरावून नेलें असेल त्याचेकडून तें न कळत—चोरूनच—आणले पाहिजे. तें आपण केव्हा आणले ह्याची त्याना दादही लागता उपयोगी नाहीं.

पण ही चोरी करायची कशी ? राष्ट्राचें गेलेलें स्वातंत्र्य युक्तीनें परत मिळवायचें खरें पण तें कसें परत मिळवायचे ? ह्याचा [illegible]

कोणता ? ह्या चोरीच्या चोरवाटा कोणत्या ?

ह्या चोरीचा

## पहिला मार्ग

ह्मणजे हा कीं आपण स्वत अत्यन्त शुद्ध व अत्यन्त निर्मळ राहिलें पाहिजे. मनुष्याचे चार वर्ग आपण पाहिले, पण ह्या चार वर्गांपैकीं आपण पाहिल्याच वर्गात बसण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सर्व स्वार्थाला रजा दिली पाहिजे. खाजगी वर्तन अत्यन्त योग्य ठेवले पाहिजे. पातकी मोहातून स्वत ला अलिप्त ठेवलें पाहिजे. कनक आणि कान्ता -मद्य आणि द्यूत-वैभव आणि विलास-ह्याचा स्पर्शही स्वत स होऊ देता उपयोगी नाहीं एकच व्यसन आपण धरले पाहिजे आणि तें कोणतें ? तर राष्ट्राचे पारतन्त्र्य नाहीसे करणे ! हें एकच व्यसन ! हा एकच नाद ! हे एकच वेड जर आपणाजवळ असेल तरच आपण ह्या कार्याला लायक होऊं, नाही तर आपल्या कार्याला यश मिळणार नाहीं.

आणि हे यश मिळविण्याकरिता राष्ट्रकार्यातही आपण असा निर्धार केला पाहिजे कीं धर्मराज खोटें बोललेले असोत— शिवाजीने अफजुलखानाचा वध केलेला असो-श्रीकृष्णांनी कपटव्यूह रचलेले असोत परन्तु उच्च कार्यात देखील मी असत्याचा डाग लागूं देणार नाहीं.

## दुसरा मार्ग

अशा रीतीनें आपण अन्तर्बाह्य शुद्ध व नीतिमान् झाल्यानन्तर

सर्व जगाकडे आपण उदार दृष्टीनें पाहिलें पाहिजे. जगाची प्रवृत्ति आपण निरीक्षण केलेलीच आहे. जगात सत्य फार थोडें आहे. वेश्यागारापासून तों देवालयापर्यन्त अनृत, असत्य व अनीति भरलेली आहे. ह्या जगात इंग्रजही पवित्र नाहींत व कैझरही अपवित्र नाहीं. ह्या जगात गान्धीहि सत्यवान् नाहींत व तात्या टोपीही असत्यवान् नाहींत. सर्व जगत् सारखें आहे. सर्वत्र सत्य-- असत्याची भेसळ आहे. तिथें अमुक चांगला व अमुक वाईट हा भेद काय उपयोगी? इथें खरा कोण व खोटा कोण? ह्या जगात सत्यात असत्य आहे व असत्यात सत्य आहे. ह्यासाठीं सर्वांविषयीं प्रीति, सर्वांविषयीं आपुलकी व सर्वांविषयीं आदर बाळगला पाहिजे. किम्बहुना येशू ख्रिस्ताप्रमाणें आपण सर्वांना अशी परवानगी दिली पाहिजे कीं " चुकलेल्यानो, माझ्याकडे या; भटकलेल्यानो, माझ्याकडे या, पातक्यानो, माझ्याकडे या व सन्मार्गाला लागा."

## तिसरा मार्ग

आणि हें नुसतें बोलूनच उपयोगी नाहीं तर त्याप्रमाणे आपण वागलें पाहिजे. आपणांकडे जे कोणी येतील त्याना चांगली दिशा दाखविली पाहिजे. ही चांगली दिशा ह्मणजे अर्थात् चातुर्वर्ण्याची ! आपल्या देशबान्धवाना आपण शिकविले पाहिजे कीं जरी जगात चातुर्वर्ण्य पसरलेलें आहे, तरी ह्या चातुर्वर्ण्यात श्रेष्ठ कर्तव्य ह्मणजे आपल्या मातृभूमीला बन्धमुक्त करणे हे आहे. ह्यासाठीं सर्व इतर मनोविकार टाका व मातृभूमीवर प्रेम करूं लागा.

-१ मातृभूमीवर प्रेम करतात तींच माणसें तींच जगण्यास योग्य--त्यांचेंच तोण्ड पहावें--इतरांचें तोण्ड पाहूं नये. तुमचा सर्व स्वार्थ मातृभूमीचे हितात लीन करा. तुमचें सर्व धन मातृभूमीला अर्पण करा. तुमचे सर्व उद्योग मातृभूमीचे हितासाठीं करा. तुमची सर्व कृति मातृभूमीसाठीं करा. तुमचे सर्व आयुष्य मातृभूमीसाठीं वेंचा.

## चवथा मार्ग.

ह्यालाच लोकसंग्रह असें म्हणतात. लोकसंग्रह ह्मणजे लोकांची खुशामत करणे नव्हे---एकाच मनोविकारानें सर्व लोकास भारणें म्हणजे लोकसंग्रह होय। पण सर्व लोकानीं मातृभूमीवर प्रेम करायला शिकावें ह्मणजे काय करावें? त्यांना आपआपले धन्दे सोडून द्यावे काय? त्यानीं लेक्चरें देत फिरावें काय? त्यांनीं आपलीं मुलेंबाळे सोडून द्यावीं काय? त्यानीं खादी वापरून फकीर बनावें काय? किंवा त्यानीं पायघोळ कफनी घालून दाढी वाढवावी काय? नाहीं. ह्याची काहींएक गरज नाही. हा खरा लोकसंग्रहही नव्हे. खरा लोकसंग्रह म्हणजे प्रत्येक मनुष्यास निरानिराळे उद्योग लावणें, त्याला स्वावलम्बी बनविणें, त्याला स्वाभिमानी व संसारी बनविणें, त्याला कुशल बनविणें, त्याला कार्यव्यापृत बनविणें हा आहे. शेंकडों, हजारों, लाखों व्यवसाय जो आपल्या देशांत उत्पन्न करतो व देशबान्धवाना त्याची चटक लावून जो त्या व्यवसायातून मातृभूमीच्या विषयीं हितबुद्धि उत्पन्न करतो त्यानेंच खरा लोकसंग्रह केला असें म्हटलें पाहिजें.

## पांचवा मार्ग

आणि ह्यासाठी ज्ञान व "सायन्स" ह्याचा प्रसार शक्य तितका केला पाहिजे. देशभक्ति मूढ असता उपयोगी नाहीं. देशभक्ति अडाणी व मागासलेली असता उपयोगी नाहीं देशभक्ति पुढे धावणारी, महत्त्वाकांक्षी व सर्वदर्शी असली पाहिजे देशभक्त हा खादीवरून ओळखण्याची जरूरी नाही तो जुनें पंचांग वापरतो की नवे वापरतो ही देशभक्ताची कसोटी नको देशभक्ताची कसोटी त्याचें ज्ञान असलें पाहिजे. इंग्रज मनुष्य जितके जाणतो, फ्रान्समधील हुषार सायंटिस्ट जितके जाणतो. जर्मनीतलि प्रवीण शोधक जितके शोध लावतो, अमेरिकेतलि सर्वात बुद्धिमान् तज्ज्ञ ज्या कल्पना काढतो त्यापेक्षा देशभक्ताचे ज्ञान, त्याची बुद्धि, त्याच्या कल्पना तरतरीत पाहिजेत देशभक्तीचे हे मूळ आहे. ह्याशिवाय देशभक्ति सार्थच होऊ शकत नाहीं

## सहावा मार्ग

वरील मार्गानें गेलें ह्मणजे देशात सम्पत्ति आपोआप येईल, पण तिचा झोत ज्यास्त जोरानें चालू व्हावा यासाठीं देशबान्धवाना निर्भय व निर्भीड बनविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तरुण पिढ्याचा जोम कधीं दाबून टाकूं नये, त्याच्या साहसाच्या इच्छा तिथल्या तेथें मारूं नयेत; त्यांच्या साहसाना उत्तेजन दिले पाहिजे व हिंन्दुस्थानातल्या देशभक्ताना धाडसी व साहसी अन्तःकरणानें जगाच्या कोनाकोपऱ्यापर्यन्त धाडले पाहिजे. त्याचे जिवाला भीतीचा लवले-

शाही चिकटं देता उपयोगी नाहीं जिथें जिथें त्याना प्रतिबन्ध होईल तिथें तिथें त्याना मुद्दाम नेऊन फेकलें पाहिजे व जिथें जिथें त्याचे मार्गांत अडथळे उत्पन्न केले जातील तिथें तिथें ते अडथळे लाथाडून टाकायला त्याना शिकविलें पाहिजे असा कोण मनुष्य आहे कीं जो हिंदुस्थानातल्या मनुष्याला येथे बसूं नको असें ह्मणेल आणि असा कोण मनुष्य आहे कीं जो हिंदुस्थानातील देशभक्ताला आमचे देशात उतरू नको अशी मनाई करील ?

## सातवा मार्ग

देशभक्ताला मनाईची पर्वा नाहीं तो मनाई जाणीत नाहीं व मानीत नाही परन्तु एवढें मात्र खरें कीं जिथे तो जातो तिथें आपले उदार मन, आपलें विश्वप्रेम व आपली पवित्र वर्तनपद्धति घेऊन जातो. हिन्दुस्थानातल्या देशभक्ताना साउथ् अफ्रिकेंतले मनाई कायदे, ऑस्ट्रेलियातले प्रतिबन्धक नियम किंवा केनिया-मधील पक्षपाती हुकूम कधींही थाम्बवूं शकणार नाहींत. परन्तु जिथें तो जाईल तिथे तों आपलें श्रेष्ठ ज्ञान, आपलें श्रेष्ठ वर्तन, आपलें श्रेष्ठ चरित्र व आपलें श्रेष्ठ पावित्र्य घेऊन जाईल. एवढेंच नव्हे तर हिन्दुस्थानातला देशभक्त जिथें जिथे जाईल तिथें तिथें तो हिंदुस्थानातली उदात्त तत्त्वें त्या लोकाना शिकवील व त्याचें मन आपल्या उपदेशानें, ज्ञानानें व उदाहरणाने पूर्णपणें वश करून घेईल.

## आठवा मार्ग

अशा रीतीने पृथ्वीवरील सर्व देश, सर्व प्रदेश व सर्व मुलुख हिन्दु-

स्थानांतील देशभक्त पुरुषांनीं भरून गेले ह्मणजे त्या त्या देशातील पुढारीपण हिन्दुस्थानच्या लोकांकडे हक्कानें येईल. न्यूयॉर्कमध्यें एखादें उदाहरण अडले तर तें हिन्दुस्थानच्या गणित्याला विचारलें जाईल, मॉस्कोमध्यें राजकारणाचा प्रश्न नडला ह्मणजे हिन्दुस्थानच्या मुत्सद्याकडे तो सोडवायला येईल, बर्लीनमध्यें सामाजिक तण्टे उद्भवले तर हिन्दुस्थानचा मनुष्य ते तण्टे तोडील, रोममध्ये बायबलचें वाक्य समजलें नाहीं तर हिन्दुस्थानचे विद्वानास तें विचारण्यात येईल, लण्डन्‌मधील टेम्सनदीचा पंम्प मोडला तर हिन्दुस्थानच्या एंजिनीयरकडे तो दुरुस्तीकरिता येईल आणि तुर्कस्थानमध्यें शिय्यासुन्नींचे तण्टे लागले तर ते हिन्दुस्थानच्या प्रज्ञावान् पुरुषाकडे मध्यस्थीला सर्व येतील. जग हिन्दुस्थानला गुरु मानील, सर्व दुनिया हिन्दुस्थानला वन्दन करील, सर्व लोक हिन्दुस्थानचे भजनीं लागून त्याचे शिष्यत्व पत्करतील !

## नववा मार्ग.

आणि इतक्या पल्ल्यापर्यन्त ज्या वेळीं हिन्दुस्थानांतील देशभक्त पतील त्यावेळीं हिन्दुस्थानचें स्वातंत्र्य ज्यानीं हरण करून नेलें असेल त्याचे खिशातून तें न बोलतां परत घेता घेईल. तें अलगत घेता येईल, रेशमी रुमालानें घेता येईल, हळू हातांनीं व मंजुळ पद्धतींनीं घेतां घेईल. ज्यानीं तें हरण केलें त्याना यत्किंचित् न दुखवता व त्याना तिळमात्र शरमिन्धे न करिता तें घेतां येईल. सर्व पातक्यात दुसऱ्याचें स्वातंत्र्य हरण करणारा मनुष्य ज्यास्त पातकी

होय. धर्मशास्त्रात जीं पंच महापातकें वर्णन केलेलीं आहेत त्यांपेक्षा दुसऱ्याचे स्वातंत्र्य हरण करणारा हा जास्त गलिच्छ पापकर्म आहे. पण हें पाप ज्यानीं केले असेल त्याची शोभा करूं नका—चार चौघात त्यांना चवाठ्यावर आणूं नका—रेशमी रुमालाचे गुलगुलीत हात त्यांच्या खिशात घाला व हळूच आपलें स्वातंत्र्य काढून घ्या.

चोरी अशी करावी. ह्या नऊ मार्गांनीं चोरी करतां येईल. चोरी करायची तर हे नऊ मार्ग आहेत. बाकीचें मार्ग उघडपणाचे आहेत. त्याना उघड युद्ध अथवा Open War असें म्हणतात. ते ज्यांना करायचे असतील त्यांना त्याचे मार्ग मोकळे आहेत. त्याचेकरिता हें पुस्तक लिहिलेलें नाहीं. हें चोरीच्या मार्गाचें पुस्तक आहे. हें श्रीकृष्णाच्या मार्गाचें पुस्तक आहे. त्या सुप्रसिद्ध चौर्यकुशलानें ज्याप्रमाणें विश्वाचें प्रेम चोरले, त्या सर्वप्रिय चौर्यप्रवीणानें ज्या प्रमाणें सर्वांचें अन्तःकरण चोरून घेतलें त्याप्रमाणें सर्व देशबान्धवांचीं मनें चोरून घेण्याचें हें पुस्तक आहे. ह्या मधुर चौर्यकर्मावर लोकसंग्रहाचें नाजूक कौशल्य अवलम्बून आहे. लोकसंग्रहावर सामुदायिक कार्यप्रवृत्ति अवलम्बून आहे. सामुदायिक कार्यप्रवृत्तिवर ज्ञानप्रगति अवलम्बून आहे व ज्ञानप्रवृत्तीवर वैभवाची भरती अवलम्बून आहे. पण ह्या सर्वांना जवळ करायला धाडस, उत्साह व निर्भयता पाहिजे आणि ह्या निर्भयतेला पवित्र हेतूंची व दिलदार विश्वप्रेमाची जोड पाहिजे. हिंदुस्थान बुडाला, हिंदुस्थान परवश झाला, म्हणून कशाला शोक करता? डोळ्यांत पाणी काय म्हणून आणतां?

ज्या वेळीं मन परवश होतें त्याचवेळीं देश परवश होतो जोंपर्यन्त मन परवश झालेलें नाहीं तोंपर्यंत हिन्दुस्थानहीं परवश झालेला नाहीं. मग त्याचेवर युनियन् जॅक फडको किंवा दुसरें निशाण लागो. पण हिंदुस्थानच्या तरुणांत अजून अक्कल आहे, हुषारी आहे, तरतरी आहे. पाच हजार मैलावरून परकीय लोक येऊन जर त्यानीं हिन्दुस्थानचें स्वातंत्र्य आपल्या घशात टाकले असेल तर हिन्दुस्थानही असा कांहीं चमत्कार करील कीं लबाड लोकांनीं नेलेलें तें स्वातंत्र्य हलक्या हातानी व रेशमी रुमालानीं तो परत घेईल. पण त्याकरिता चोरीचें शास्त्र अवगत पाहिजे. तें शास्त्र तरुणाचे रोमारोमात मुरलें पाहिजे.

हें चोरीचें शास्त्र पूर्वी कार्तिकेयाने काढलें असे मागें सांगितलेंच आहे. पण त्याचा यशस्वी प्रयोग दैत्यापासून संजीविनी आणताना कचानें केला श्रीकृष्णानें तर आपल्या मधुर चौर्यकर्माची कमाल करून प्रत्येक पिढीचीं अन्तःकरणें चोरून घेतलीं हा ग्रन्थ त्यासच अर्पण असो व लोकसंग्रहासाठीं जनतेचीं अन्तःकरणें चोरून घेणारे कार्यप्रवर्तक ह्या हिन्दुस्थानात त्याच्याच कृपेनें पुनः पुन्हा जन्म पावोत !

---

**प्रकरण २० वें**

( १ ) सर्व मनुष्यप्राण्याचे चार विभाग करता येतात. हे विभाग मनुष्याचे हेतु व वर्तन ह्यांचेप्रमाणें होतात.

( २ ) ज्याचे हेतु उच्च व वर्तन सत्य ते अत्यन्त श्रेष्ठ पुरुष होत. ज्याचे हेतु उच्च, पण वर्तन असत्य तेही श्रेष्ठच, पण पहिल्यापेक्षा कमी.

योग्यतेचे ! ज्याचे हेतु सामान्य, पण वर्तन चोख, ते कनिष्ठ दर्जाचे होत व ज्याचे हेतु सामान्य आणि वर्तनही खोटे ते अत्यन्त नीच पुरुष होत.

( ३ ) क्लाइव्ह सारखे नीच पुरुष चवथ्या वर्गातील आहेत.

( ४ ) स्वतःचें वैभव वाढविण्याची इच्छा जशी हीन प्रतीची, तशीच स्वतःच्या राष्ट्राचे वैभव वाढाविणे ही हीन प्रतीचीच इच्छा आहे. आपल्या देशाच्या उत्कर्षाकरिता जे दुसऱ्याना गुलामगिरीच्या कर्दमात ढकलतात ते श्रेष्ठ पुरुष खासच नव्हेत.

( ५ ) सर्वांत उच्च हेतु ह्मणजे आपला देश पारतन्त्र्यातून सोडविणें हा आहे.

( ६ ) प्रत्येक मनुष्याने हेच ध्येय आपलेसमोर ठेवलें पाहिजे.

( ७ ) आपल्या राष्ट्राचें स्वातन्त्र्य जर दुसऱ्या कोणीं हरण केलें असेल तर तें स्वातन्त्र्य मिळविण्याचे तीन मार्ग आहेतः—

( अ ) त्या राष्ट्राचे बरोबर उघड लढाई ( Otohen War ) करणें. इतिहासात हाच मार्ग बहुतेक आचरलेला दिसतो.

( आ ) त्या राष्ट्राला अनेक युक्त्या करून गोत्यात आणणें. श्रीशिवाजी महाराजानीं हा मार्ग आचरला हा मार्ग निन्द्य नाहीं. किम्बहुना प्रबळाशीं दुर्बळाचा प्रसंग आला म्हणजे ह्या मार्गाचेच अवलम्बन करावें लागतें.

( इ ) त्या राष्ट्राला न कळत व न समजू देता त्याजपासून आपलें स्वातन्त्र्य परत मिळविणें.

**पण ही चोरी कशी करावी ?**

ह्याचीं ९ साधने आहेतः—

( १ ) प्रथमतः पुढाऱ्यानें स्वतःचें वर्तन अत्यन्त शुद्ध व पवित्र ठेवलें पाहिजे. त्याने कधी हेतूसाठीं देखील अनीतीचा स्पर्श न होऊं देतां...

निर्धार केला पाहिजे.

(२) त्याने सर्व लोकाविषयीं उदार वृत्ति ठेवून त्यास आपलेभोवती जमविलें पाहिजे. जगात सत्य आणि असत्य ह्यांचे मिश्रण झालेलें आहे. असत्यही अनेक वेळां निरुपाय म्हणूनच आचरण्यात येतें. तेव्हा सत्याचें फार स्तोम माजवून त्यानें कोणाचाही धि:कार करता उपयोगी नाहीं.

(३) ह्याप्रमाणें अनुयायी जमविल्यानन्तर त्यानें त्याच्यात देशाच्या स्वातन्त्र्याविषयीं उत्कट इच्छा उत्पन्न केली पाहिजे.

(४) त्यानें ह्या अनुयायात असंख्य उद्योग व व्यवसाय उत्पन्न करून त्यास श्रीमन्त, सुखी व कार्यव्यापृत बनविलें पाहिजे.

(५) "सायन्स" व इतर ज्ञान ह्याचा जारीनें फैलाव करून आपल्या अनुयायांस त्याने जगातील कोणत्याही राष्ट्रापेक्षा ज्यास्त बुद्धिवान् व ज्यास्त कल्पक केलें पाहिजे.

(६) दुसऱ्या राष्ट्रांनीं घातलेले कृत्रिम व स्वार्थी निर्बन्ध तोडून टाकण्याइतके धाडस त्यानें आपल्या अनुयायात उत्पन्न केलें पाहिजे.

(७) त्यानें ह्या अनुयायाकडून जगातील सर्व राष्ट्रांना उच्च नीतिमत्तेचे धडे देवविलें पाहिजेला

(८) त्यानें ज्ञान, नीति, 'सायन्स, व सामर्थ्य ह्याचे बळावर स्वत:कडे व स्वत:च्या अनुयायाकडे जगातील सर्व राष्ट्रांचें गुरुत्व येईल अशी तजवीज केली पाहिजे.

(९) आणि नन्तर ज्यानें त्याच्या राष्ट्राचें स्वातन्त्र्य हरण केलें असेल त्याचे खिशातून तें स्वातन्त्र्य नाजूक हातानीं काढून घेऊन तें आपल्या मातृभूमीचे स्वाधीन केलें पाहिजे.

चोरीचें शास्त्र हें! हेंच श्रीकृष्णाच्या अवताराचें सार! व म्हणून हें पुस्तकही त्याच श्रीकृष्णास समर्पण.